# माडिया गोंडांची बोली

— लेखिका —
डॉ. सौ. शैलजा देवगांवकर

महाराष्ट्र राज्य
साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

# माडिया–गोंडांची बोली

## लोकसाहित्य व संस्कृती

: लेखिका :

डॉ. सौ. शैलजा श. देवगांवकर

एम्. ए. पीएच्. डी.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

प्रथमावृत्ती–मे, १९९०

प्रकाशक :

सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि
संस्कृती मंडळ,
नवीन प्रशासन भवन,
मुंबई–४०० ०३२.



मुद्रक :

विकास म्हात्रे
रचना प्रिंटर्स,
राऊत इन्डस्ट्रीयल इस्टेट,
माहिम मुंबई–४०० ०१६.

किंमत रुपये ३०/–

# अनुक्रमणिका

# - मनोगत -

आदिवासींचे जीवन निसर्गाच्या परिसरात फलते, फळते आणि बहरते. त्यामुळे साधेपणा आणि निरागसपणा ही आजही त्यांची वैशिष्ट्ये असून एका अत्यंत समृद्ध आणि अभिजात संस्कृतीची जपणूक हजारो वर्षांपासून त्यांनी केलेली आहे. भारतात सुमारे सहाशेच्या आसपास आदिम जमाती असून भारताच्या लोकसंख्येच्या ७·७६ टक्के अदिवासी भारतात आहेत. आपल्या तथाकथीत प्रगत आणि आधुनिक संस्कृतीपासून दूर असले तरी अनेक परंपरागत सद्‌गुणांची जतन त्यांच्यात आढळते. आणि त्यांच्या जीवनाचा व सांस्कृतिक समृद्धीचा वारसा मौखिक परंपरेने चालत आलेल्या लोकसाहित्यात सापडतो. लिपिबद्ध नसल्यामुळे हे साहित्य आधुनिकीकरणाच्या प्रक्रियेत विसरले जाण्याची शक्यता आहे. अजूनही काही आदिवासी अरण्यात व पहाडी मुलुखात राहत असल्यामुळे तसेच सामाजिक-आर्थिक दृष्ट्या बाह्य संस्कृतीपासून अलिप्त असल्यामुळे त्यांचे वर्गीकरण अति-मागास (Primitive) असे करण्यात आलेले आहे.

महाराष्ट्रातील एका अति-मागास मानण्यात आलेल्या माडिया-गोंड या आदिम जमातीच्या बोलीचा आणि लोकसाहित्याचा अभ्यास पुस्तक रुपाने सादर करतांना प्रस्तुत लेखिकेला अत्यंत आनंद होत आहे.

प्रस्तुत अभ्यासात, विशेषतः क्षेत्रकार्यात, एटापल्ली भामरागढ विभागातील अनेक माडिया स्त्री-पुरूषांनी लेखिकेला मनःपूर्वक सहकार्य दिले. त्यात प्रामुख्याने श्री. बोडंगा कांदो, श्री. मिस्वा, श्री. मल्लू आणि विज्जा हिचामी तसेच कु. जमनी ह्यांचे विशेष सहकार्य मिळाले. त्याचप्रमाणे ख्रिस्तवासी श्री. वसंतराव पटवर्धन आणि कुटूंबीय तसेच कृष्णारचे श्री. कवडू खापने ह्यांनीही वेळोवेळी मोलाचे सहकार्य दिले. मानवशास्त्र आणि भाषाशास्त्र ह्यांच्या दृष्टीने लंडन येथील प्रा. ख्रिस्तॉफ-व्हॉन फ्युरर हायमेन्डॉर्फ व सौ. एलिझाबेथ हायमेन्डॉर्फ. तसेच ऑक्सफर्ड विद्यापीठाचे प्रा. वूल्फगँग क्नावे ह्यांनीही प्रोत्साहन दिले.

माझे गुरुवर्य प्रा. म. शं. वावगावकर तसेच डॉ. वि. भि. कोलते आणि अमरावतीचे डॉ. द. ह. अग्निहोत्री ह्यांनी अत्यंत मौलिक मार्गदर्शन दिले. त्याचप्रमाणे पुण्याच्या डेक्कन कॉलेज अँड रीसर्च इन्स्टियूटचे संचालक आणि प्राध्यापक व ग्रंथपाल, तसेच भाषाशास्त्रातील तज्ञ प्रा. ना. गो. कालेलकर व प्रा. अशोक केळकर डॉ. सेतुमाधवराव पगडी या सर्वांचे मार्गदर्शन लाभले. पुणे विद्यापीठातील मानवशास्त्र विभागाचे प्रा. रा. के मुटाटकर व डॉ. विजय भानू आणि ग्रंथपाल ह्यांनीही सहकार्य दिले. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे तत्कालीन सचिव श्री. म. श्री. दीक्षित आणि ग्रंथपाल सौ. गोखले ह्यांचे देखील बहुमोल सहकार्य मिळाले. वरील सर्वांची **मी** अत्यंत ऋणी आहे.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ आणि विशेषेकरून त्यांचे अध्यक्ष प्रा. डॉ. यशवंत मनोहर आणि सचिव श्री. पं. रा. पाटील ह्यांनी या पुस्तकाच्या प्रकाशनात घेतलेल्या पुढाकारामुळेच हे पुस्तक प्रकाशात येऊ शकले. त्यासाठी **मी** त्या सर्वांची अत्यंत आभारी आहे. माझ्या या कार्यात मला प्रेरणा देणारे माझे पती डॉ. श. गो. देवगांवकर ह्यांचा ऋणनिर्देश करणे हेही मी माझे कर्तव्य समजते.

बरोरा,
घटस्थापना : दि. ३०-९-१९८९

**शैलजा देवगांवकर**



नावा लोन - (माझे घर) एक 'आनचाडी' (स्त्री)



हिदूर येथील स्त्रिया - 'पेकूर–पिलांसह'



एक बडा - माडिया कुटूंब
(स्त्रीच्या गळयातील 'झुल्कडबी' स्पष्ट दिसत आहे)



माडिया स्त्रियांसह लेखिका



कुवाकोडीहून भामरागडला कामानिमित्त आलेली बडा-माडियांची चमू
(मागे आमचे सहकारी श्री. इ. व्ही. पाटील दिसत आहेत.)



फुंडी ग्रामातील एक नवविवाहीता, उज्वल भवितव्याची
आशा तिच्या मुखावर विलसत आहे.



लोकनृत्यात प्रथम क्रमांक मिळविलेली मांडियांची चमू आपल्या ढोल व पागईसह.
उजव्या बाजूला मृतांचे स्मारक असलेला कलबंडा दिसतो आहे.



कृष्णार येथील श्री. बोंडगा कांदो बारसेवाड्याच्या विज्जा पेरम्यासह

वरील सर्व छायाचित्रे लेखिका डॉ. सौ. देवगांवकर यांची

# प्रकरण पहिले
## प्रस्तावना

### भारतातील विविध आदिमजाति

भारत देश हा बहुविध बहुढंगी संस्कृतिने रंगलेला देश आहे. फार मोठ्या अशा ह्या भूखंडावर सलोख्याने अनेक संस्कृती नांदत होत्या अशी इतिहासाची साक्ष आहे आर्य ह्या प्रदेशात आले. आणि **'बहुरत्ना वसुंधरा'** अशी सुजला-सुफला–समृद्धियुक्त बघताच इथेच स्थायिक झाले. एतद्देशीय द्रविड लोकांशी कधी सामोपचाराने, कधी दडपशाहीने तर कधी सलोख्यानेच का होईना पण त्यांनी संबंध प्रस्थापित केले. आर्य आणि द्रविड संस्कृतीची अशा रीतीने हातात हात घालून वाटचाल सुरू झाली. एवढेच नव्हे तर त्या एकमेकात मिसळून जणू एकजीव झाल्या. आजच्या भारतात तर भिन्नतेची जाणीव सुद्धा होत नाही.

आज भारताकडे नजर टाकली तर साऱ्या भारतभर आदिवासी जमाती विखुरलेल्या दिसतात.[1] सन १९७१ च्या शिरगणती नुसार आदीवासींची संख्या ३८,०१५,१६२ इतकी असून एकूण लोकसंख्येच्या ६.९३ टक्के इतकी आहे. शिरगणतीच्या यादीनुसार ४२७ आदीवासी जमाती आहेत. साऱ्या भारतभर पसरलेल्या ह्या आदीवासी जमातीचे प्रादेशिक दृष्टचा, ऐतिहासिक, वांशिक आणि सामाजिक–सांस्कृतिक आधारावर खालील प्रमाणे विभाग पाडता येतील:–

अ. उत्तर–पूर्व भारत (North–East)–आसाम, अरुणाचल प्रदेश, मिझोराम, नागालॅण्ड, मणिपूर आणि त्रिपुरा.

ब) उत्तर–उत्तर पश्चिम हिमालयीन प्रदेश (Sub–Himalayan)– हिमाचल प्रदेश, पजाब व उत्तरप्रदेशातून घेतलेल्या भागासह.

क) मध्य व पूर्व भारत (Central and East India)– प. बंगाल, बिहार, ओरिसा, मध्यप्रदेश व आंध्रप्रदेश.

ड) दक्षिण भारत–तामिळनाडू, केरळ, म्हैसूर.

इ) पश्चिम भारत–राजस्थान, गुजराथ, महाराष्ट्र.

सांख्यिक दृष्टचा महत्वाच्या ज्या जमाती आहेत. त्या खालील प्रमाणे– मध्यप्रदेश, महाराष्ट्र व आंध्रप्रदेशातील **'गोंड'**, राजस्थान, गुजराथ, महा-

---

[1] C. O. I. The Tribal People of India, Publication Division, 1973 New Delhi. p. 175.

राष्ट्र आणि मध्यप्रदेशातील '**भिल्ल**,' बिहार ओरिसा व प. बंगाल मधील '**संस्थाल**.'

## महाराष्ट्रातील आदिवासी–

भारतामधील '**महाराष्ट्र**' ह्या घटक राज्याकडे लक्ष केन्द्रीत केल्यास असे आढळून येते की, १९७१ च्या शिरगणतीनुसार महाराष्ट्रातील आदिवासींची जनसंख्या ३०.९५ लक्ष इतकी असून राज्याच्या लोकसंख्येच्या सहा टक्के इतकी आहे.[1] त्यादृष्टीने आदिवासी लोकसंख्येच्या प्रमाणात भारतात महाराष्ट्राचा पाचवा क्रमांक लागत असून भारतातील लोकसंख्येच्या आठ टक्के आदिवासी महाराष्ट्रात आहेत. स्थूल मानाने आदिवासींची दाट वस्ती असलेले दोन पट्टे पाडण्यात येतात.

(१) सह्याद्रीची पट्टी व (२) गोंडवना पट्टी. सातपुड्याच्या टेकड्या ह्या दोनही पट्ट्यात मोडतात.

सह्याद्रीपट्टीत प्रामुख्याने– ठाणे, नाशिक, धुळे, पुणे, अहमदनगर व कुलाबा ह्या जिल्ह्यांचा समावेश होतो. ह्या पट्टीमध्ये प्रामुख्याने पुढील आदिवासी जमातीचे लोक आढळतात. कोळी–महादेव, वारली, कोकणी, ठाकूर, काथोडी, कोळी–मल्हार, कोळी–ढोर, दुबला, गमीट, पारधी, धोडिया आणि नाईकडा.

**गोंडवना पट्टीत**, अमरावती, चंद्रपूर, नागपूर, भंडारा, यवतमाळ आणि नांदेड ह्या जिल्ह्यांचा अंतर्भाव होतो. ह्या जिल्ह्यांमध्ये गोंड, अंध, कोलाम, परधान, हलबा, कोरकू, धनका, रनधवा आणि कंवार हे आदिवासी आढळतात.

एकूण ४० आदिवासी टोळ्यांची नोंदणी करण्यात आलेली असून त्यांची लोकसंख्या व एकूण आदिवासी जमातीशी प्रमाण हे सोबत जोडलेल्या तक्त्यात दिलेले आहे. (तक्ता क्रमांक एक)

त्याचप्रमाणे महाराष्ट्रातील सर्व जिह्यांतील लोकसंख्या आणि आदिवासींचे प्रमाण तक्ता क्र. २ मध्ये दिलेले आहे. तक्ता क्र. २ वरून असे निदर्शनास येते की, महाराष्ट्रात आदिवासींची लोकसंख्या सर्वांत जास्त धुळे ६.१६ लक्ष, नंतर ठाणे ५.८० लक्ष, नाशिक ५.६१ लक्ष आणि चंद्रपूर जिल्हा २.९४ लक्ष ह्या प्रमाणे क्रमवार आहे.

आदिवासी जमाती इतर प्रगत जमातींपेक्षा मागासलेल्या असल्या तरी सामाजिक व आर्थिक दृष्ट्या विकास प्रक्रिया त्यांच्यापैकी अनेक जमातीत सुरू झालेली आहे. तरीही मानववंशशास्त्रज्ञांच्या मते अजूनही काही आदिवासी जमाती

[1] Govt. of Mharashtra Sud–Plan for Adivasis, Maharashtra State, A Summary (1974-1979), Social walfare cultural affairs, Sports & Tourism Development, Bombay. p. 3.

सांस्कृतीकरणाच्या अत्यंत प्राथमिक अवस्थेत आहेत. आणि त्यांचा उल्लेख (Primitive Tribals) '**अतिमागास आदिम जाती**' असा करण्यात येतो. उदा० केरळ राज्यातील निलगिरी पर्वताच्या उतारावरील मंचेरी अरण्यात गुहांमधून राहणारे '**चोला नायकन**' हे आदिवासी, किंवा तामिळनाडूतील आनिमलाई आणि मुन्नार टेकड्यांच्या दरीत राहणारे '**कदन**' तसेच मध्य प्रदेशातील रायगड जिल्ह्यातील बगीचा विकास खंडात राहणारे '**पहाडी कोरवा**' व बस्तर मधील '**अभुज माडिया**' ह्यांचाही उल्लेख करता येईल. महाराष्ट्रातील आदीवासी, तुलनात्मक दृष्टचा सांस्कृतीकरणाच्या बऱ्याच पुढील अवस्थेत असले तरी दोन आदिवासी जमातींना '**अतिमागास जमाती**' म्हणून उल्लेखिण्यात आलेले आहे. त्यापैकी ठाणे, कुलाबा, जिल्ह्यातील **काटकरी** ही एक जमात असून प्रस्तुत प्रबंधाचा अध्ययन विषय असलेली चन्द्रपूर जिल्ह्यातील '**माडिया–गोंड**' ही दुसरी जमात होय. प्रख्यात प्रशासक–मानववंशशास्त्रज्ञ नॉर्थइस्टर्न कॉन्सिल च्या शिलाँग येथील मुख्यालयाला नियोजनविषयक मल्लागार, व सध्या नॉर्थ–इस्ट हिल युनिव्हर्सिटी शिलाँगचे कुलगरू असलेले डॉ. ब्रह्मदेव शर्मा ह्यांच्या मते चन्द्रपूर जिल्ह्यातील '**माडिया–गोंड**' ही बस्तरम धील अभुज माडियांचीच लाहेरी टेकडचा ओलांडून आलेली एक शाखा होय.

## वैदर्भीय आदिवासी जमाती–

विदर्भातील आदिवासी जमातींमध्ये लक्षात घेता येईल इतपत **संख्येने** असलेल्या गोंड, कोरकू, परधान, कोलाम, गोवारी, हळबी ह्या टोळ्यांचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. विदर्भात वैदर्भीय संस्कृतिशी कोरकू, कोलाम, आणि बहुतांश गोंड हे केवळ समरस झालेलेच नव्हेत तर त्यात सामावून गेलेले आढळतात. मात्र अरण्यात व अवघड अशा दऱ्याखोऱ्यात राहणाऱ्या ह्या जमाती, बाह्यजगाशी जवळ जवळ संपर्क न आल्यामुळे अजूनही स्वतःची संस्कृती मूळ-स्वरूपात टिकवून आहेत. त्यात आर्थिक व सामाजिक दृष्टचा बाह्य जगाच्या हजारो वर्ष मागे असलेल्या पण स्वतःच्या निर्भेळ व निरागस संस्कृतीची जपणूक करीत असलेल्या **माडिया गोंडांचा** प्रथम क्रमांक लागतो. एका अर्थी त्यांचे अति–मागासपण हे त्यांच्या आदिवासी व सांकृतिक आणि इतर वैशिष्टचांच्या जपणुकीस सहाय्यभूत ठरले आहे.

## विदर्भातील आदिवासी

विदर्भातील आदिवासींचा विचार करता असे दिसून येते की, बुलढाणा, अकोला, वर्धा, नागपूर आणि भंडारा ह्या पाच–जिल्ह्यांमध्ये आदिवासी जमाती जवळ जवळ नाहीत. उरलेल्या तीन जिल्ह्यांमध्ये म्हणजे, अमरावती, चन्द्रपूर व यवतमाळ ह्यांत फक्त सात तहसीलींमध्ये वर्गीकृत आदिवासी जमाती आढळतात.

| जिल्हा | तहसील |
|---|---|
| अमरावती | मेळघाट. |
| यवतमाळ | वणी, केळापूर, यवतमाळ |
| चन्द्रपूर | राजुरा, गडचिरोली, सिरोंचा. |

अशा प्रकारे तीन जिल्ह्यांत व त्यातही काही तहसीलीतच मोठ्या प्रमाणावर आदिवासी केन्द्रीत झालेले आहेत.

## आदिमांच्या बोलिचा अभ्यास–एक उपेक्षित बाब–

विकासाच्या दृष्टीकोनातून आदिवासी भाषांकडे दृष्टिक्षेप टाकता १९१९ साली नेमण्यात आलेल्या कलकत्ता विद्यापीठ आयोगाने मांडलेले विचार ग्रहणीय वाटतात.

'The mother–tongue is the true vehicle of mother wit.. it gives the mind the relief and illumination as it clutches after the aid of words, when new ideas or judgements spring wordless recesses of thought or feeling under the stimulus of physical experience or of emotion. Hence in all education the primary place should be given to training in the exact and free use of the mother–tongue.'

कोठारी आयोगानेही आदिवासी भाषांच्या शिक्षणाचे माध्यम म्हणून प्राथमिक शिक्षणाच्या पहिल्या दोन वर्षात उपयोग करावा अशी शिफारस केली होती. भाषा ही त्या जनसमुहाच्या संस्कृतीचा भाग असल्याने ती संस्कृतीच्या प्रगटीकरणाचे एक महत्वाचे साधन होय. ती भाषाच त्या समुहाच्या वर्तणूकीच्या आकृतीबंधाचे स्वरुप स्पष्ट करते. खाण्यापिण्याच्या सवयीपासून तो आध्यात्मिक ज्ञान साधनेपर्यंत सर्व गोष्टी भाषेच्याच माध्यमातून साध्य होतात. आदिवासी भाषासुद्धा पुरेपूर प्रमाणात विकास पावू शकतात; ह्याची भारतातच उदाहरणे आहेत. उदा. नागलॅण्ड प्रदेशातील **आओ**, अंगामी **सेमा** ह्या भाषांचा इतका विकास झालेला आहे की, विद्याभ्यासाच्या क्षेत्रात त्यांनी इतर भाषांना मागे टाकले आहे. आणि नागा विद्यार्थी माध्यमिक शिक्षणही ह्या भाषांमधून घेतात. आसाममध्ये '**बोडो**' ही आदिवासी भाषा अत्यंत प्रगत अवस्थेला पोहोचलेली असून केवळ १५ वर्षांच्या काळात उच्च माध्यमिक आणि पदवीपूर्व शिक्षणक्रमात शिक्षणाचे माध्यम म्हणून तिला स्थान प्राप्त झाले आहे.[१] आदिवासी भाषेचा

---

१ **Tabu Taid** 'A Note on Tribal languages as media of Instructions', **Souvenir, All India Tribal Conference,** B. A. J. S. S. Gauhati, pp. 29–30

अभ्यास केवळ भाषिक दृष्टीकोनातूनच नव्हे तर संस्कृती आणि सामाजिक विकास ह्यासाठीही किती आवश्यक आहे हे वरील विवेचनावरून स्पष्ट होते.

## माडिया–गोंडीचे अध्ययन

माडियाच्या माडिया–गोंडी ह्या बोलभाषेचा वरील दृष्टिकोनातून अभ्यास अजूनपर्यंत झालेला नाही हे प्रस्तुत लेखिकेचे मत आहे. विशेषतः (Primitive Tribals) अति–मागास आदिम जाती म्हणून ज्यांचे वर्गीकरण झालेले आहे त्या एटापल्ली–भामरागड विभागातील माडिया गोंडीचा वरील दृष्टिकोनातून अभ्यास झालेला नाही. सिरोंच्याच्या बाजूने तेलगू भाषिक भागाला (आंध्र प्रदेश) लागून असलेल्या भागाने माडिया–गोंडीचा अभ्यास झालेला असला तरीही तो अभ्यास निव्वळ भाषाशास्त्रीय दृष्टिकोनातून झालेला आहे. त्यांत भाषेतील संस्कृती, वाङ्मय आणि विकास–क्षमता ह्यांचा अजिबात विचार झालेला नाही. त्याच प्रमाणे ब्रिटीश अधिकारी डब्ल्यु. व्ही. ग्रिगसन ह्यांनी Madia Gonds of Bastar (1938) ह्या त्यांच्या पुस्तकात बस्तर विभागातील माडियाच्या भाषेवर थोडेसे विवेचन केलेले आहे. जी. ए. ग्रिअर्सन ह्यांनी Linguistic Survey of India. ह्या त्यांच्या प्रख्यात ग्रंथाच्या चवथ्या खंडात (Munda and Dravidian Languages) बस्तर विभाग व चन्द्रपूर जिल्ह्यातील माडिया बोलीचा गोंडीच्या अंतर्गत '**तथाकथित बोली**' (So–called Maria Dialect–? ) म्हणून अभ्यास केलेला आहे.

काही प्रशासकांनी चन्द्रपूर जिल्ह्यात काम करीत असताना ह्या भाषेचा अभ्यास करून शब्दसंग्रह संकलित केले आहेत. ह्यांत जंगलखात्यातील अधिकारी श्री. विश्वास भालचंद्र जोशी ह्यांच्या '**माडिया भाषा मार्गदर्शक**' ह्या पुस्तिकेचा उल्लेख करावा लागेल. त्याचप्रमाणे महाराष्ट्राच्या समाज कल्याण विभागातील अधिकारी श्री. अनंतराव बोधनकर ह्यांची मराठी तसेच इंग्रजीतून '**गोंडी ('कोयांग') –मराठी पुस्तिका**' ही १९६४ साली महाराष्ट्र राज्याच्या समाज कल्याण संचालनालयाच्या आदिवासी संशोधन विभागातर्फे प्रकाशित केली असून हिच्यात सुमारे २५० गोंडी वाक्ये व त्यांची मराठी भाषांतरे दिली आहेत. तसेच शब्दांचा संग्रह (**शब्दकोश–गोंडी–मराठी**) दिलेला आहे.

अनेक वर्ष अहेरी–एटापल्ली भागात ख्रिश्चन मिशनतर्फे कार्य करणारे रेव्हरंड एस. बी. पटवर्धन ह्यांचे '**गोंडी मॅन्युअल**' १९३५ साली लंडनहून प्रसिद्ध झाले. त्यांनीच लिहिलेला '**गोंडी मराठी शब्दकोश**' हस्तलिखिताच्या स्वरूपात उपलब्ध असून त्यांत माडिया शब्दांची भर घालून प्रकाशित करण्याचे काम सुरू आहे.

बस्तर विभागातील '**गोंडी बोलीचे व्याकरण**' श्री. मिचेल ह्यांनी लिहिले

आहे. त्याचप्रमाणे मध्यप्रदेशातील बैतुल जिल्ह्यात बोलण्यात येणाऱ्या गोंडीवर श्री. सी. जी. ट्रेन्च ह्यांनी दोन भागात विभागलेला ग्रंथ लिहीलेला आहे. १९१९ साली महाराष्ट्रीतील प्रख्यात इतिहासतज्ञ आणि प्रशासक श्री. सेतु माधवराव पगडी ह्यांनी आदिलाबाद जिल्ह्यातील गोंडी बोलीवर त्यांच्या प्रशासकीय कार्यालयात केलेल्या अभ्यासावर आधारित व्याकरण पुस्तिका फेब्रुवारी १९५४ मध्ये प्रकाशित केलेली आहे. तसेच आंतरराष्ट्रीय किर्तीचे मानववंशशास्त्रज्ञ, लंडन विद्यापिठातील प्रोफेसर ख्रिस्तॉफ व्हॉन फ्युरर–हायमेन्डार्फ ह्यांनी आदिलाबाद विभागाचे आदिवासी आयुक्त म्हणून काम करीत असताना '**गोंडी प्रायमर**' १९४० साली देवनागरी लिपित प्रकाशित केलेले आहे. ह्या पैकी बरेच ग्रंथ आज उपलब्ध नाहीत. ह्याशिवाय नियतकालिकांमधून झालेल्या लिखाणात चन्द्रपूरचे श्री. बि. वा. जोशी ह्यांचे १९५३ ते १९७० सालांच्या मध्ये जे विविध लेख प्रकाशित झालेत त्यांत '**समाज सेवा**' च्या सप्टेंबर १९७० च्या अंकात 'गोंडी बोली' हा लेख प्रकाशित झाला आहे. तसेच त्यांच्या इतरही लेखांमधून भाषेसंबंधी त्रोटक उल्लेख आढळतात. श्री. अनिल थत्ते ह्यांचे '**भामरागडची भ्रमण-गाथा**' हे पुस्तक साधना प्रकाशनाद्वारे पुणे येथे ऑगस्ट १९७२ मध्ये प्रसिद्ध झाले असून त्यात भामरागड विभागातून झालेल्या सहलीचा धावता वृत्तांत आहे. भाषेबावत मात्र उल्लेख आढळत नाहीत.

ल्युसी स्मिथ ह्यांचा 'Report of the land Revenue Settlement of Chanda District, Central Provinces, 1869' हा नागपूरहून १८७० साली प्रकाशित झाला. हा रिपोर्टही अभ्यासदृष्टया महत्वाचा ग्रंथ आहे.

श्री. स्टीफेन हिस्लॉप ह्यांना लिहीलेले, 'Papers Relating to the Aboriginal Tribes of the Central province.' श्री. आर. सी. टेपल ह्यानी संपादित करून व टिपणे आणि प्रस्तावना लिहून नागपूरहून १८६६ साली प्रकाशित केले आहे.

गोंड आणि गोंडी भाषेवरील वरील प्रकाशित तथा अप्रकाशित उपलब्ध वाङ्मयावरून नजर फिरविल्यास असे लक्षात येते, की ह्या लेखकांमध्ये स्वातंत्र्यपूव काळातील ब्रिटीश राजवटीतील ब्रिटीश प्रशासक आणि अपवादात्मक श्री. सेतु माधवराव पगडीसारखे भारतीय प्रशासक ह्यांनी प्रशासकीय कार्य पार पाडीत असताना गोंड जमात व गोंडी भाषा ह्यांचा अभ्यास केला. त्याचप्रमाणे ख्रिश्चन मिशनचे काम करणाऱ्या ख्रिश्चन मिशनऱ्यांनी, उदा. रे. पटवर्धन, अभ्यास केला. म्हणजेच अभ्यासाचा उद्देश विशिष्ट कार्यसिद्धी हा होता. ख्रिश्चन मिशनऱ्यांना त्या जमातींशी जवळचा संपर्क साधून काम समजतेने करता यावे व तसेच प्रशासकांना भाषा आकलन झाल्यामुळे शासनकार्य सुलभतेने चालविता यावे, हा उद्देश त्यामागे दिसतो. डॉ. एल्विन किंवा प्रा. हायमेन्डॉर्फ ह्याच्यासारखे प्रामुख्याने

मानववंशशास्त्रज्ञ आणि समाज सेवक असलेल्या व्यक्तींनी ह्या जमातींचा वैयक्तिकरित्या व आत्मियतेने अभ्यास केला असला तरी ग्रिअर्सन, हटन सारख्या व्यक्तींनी हाताखालच्या अधिकाऱ्यांच्या द्वारा गोळा करून जमा झालेल्या माहितीच्या आधारेच अध्ययन केले आहे. पाश्चात्य अभ्यासकांच्या बाबतीत आणखी एक गोष्ट म्हणजे आदिवासी भाषांशी संपर्क येणाऱ्या स्थानिक किंवा विभागीय भाषांचे पुरेसे ज्ञान त्यांना नसल्याने दुभाष्यांवर जास्त अवलंबून राहणे हे क्रमप्राप्त होते, त्यामुळे काही उणिवा राहण्याचा संभव अजिबात नाकारता येणार नाही.

विशेष महत्वाची गोष्ट म्हणजे भाषेकडे साहित्यिकाच्या दृष्टीने पाहणे ह्या प्रशासक किंवा मिशनरी ठेवणीच्या लोकांना शक्य नव्हते. म्हणून त्यांनी शब्द, गाणी व कथा इ. संकलित केल्या असल्या तरी त्यांचे साहित्यिक विवेचन वा मूल्यमापन झालेले नाही. त्याचप्रमाणे त्या काळात आदिवासींच्या विकासाचा विचार करण्याची आवश्यकता ब्रिटीश शासनाला नव्हती; त्याचे यापूर्वीच विवेचन केलेले आहे. त्यामुळे त्यांच्या भाषेचा आणि त्याद्वारा त्यांच्या जमातीचा विकास कसा घडून येईल ही दृष्टी त्यांच्या अभ्यासात नव्हती.

आज आदिवासींच्या भाषेचा अभ्यास करीत असताना त्यांच्या जमातीचा सर्वांगीण विकास घडवून आणण्याच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचे साधन म्हणून भाषेचा अभ्यास हा आवश्यक ठरतो. प्रस्तुत अभ्यासाचा हा एक प्रमुख उद्देश होय. केवळ भाषाशास्त्रीय दृष्टिकोनातून अभ्यास हे जरी अभ्यासकाला ललामभूत ठरत असले तरी आजच्या युगातील आपल्या राष्ट्रीय आणि सामाजिक संदर्भात बौद्धिक शक्तीचा आणि इतर संसाधनांचा तो अपव्यय ठरेल. माडियासारख्या अतिमागास आदिवासींकडे पाहण्याची बाहेरच्या सुधारलेल्या सहमांची दृष्टी बदलणे आवश्यक आहे. त्यांना आणि त्यांच्या संस्कृतीला यथायोग्य स्वरुपात लक्षात घेतल्याशिवाय गैरसमज दूर होणार नाहीत. त्यांच्या सामाजिक किंवा आर्थिक जीवनाची, त्यातील समृद्धीची तसेच दारिद्र्याची, बाह्य जगताला कल्पनादेखील येणार नाही आणि त्यामुळे आदिवासी विकास प्रक्रियेला उचित दिशा सापडू शकणार नाही. इतकेच नव्हे तर त्यांची संस्कृती आणि भाषा, तसेच बाह्य संस्कृती व भाषा ह्यामध्ये परस्पर हितावह देवाणघेवाणही अशक्य होईल. म्हणून भाषाशास्त्रीय व व्याकरणाचा दृष्टीकोन लक्षात घेऊन, परंतु त्यावर विशेष भर न देता, माडियांच्या भाषेतील साहित्य त्यातून डोकावणारी संस्कृती आणि सामाजिक परिवर्तनाची प्रक्रिया ह्या तीन दृष्टीकोनातून प्रस्तुत अभ्यास करण्यात आलेला आहे.

# विभाग पहिला

## माडिया बोलीचे स्वरूप, उगम व इतर भाषांशी संबंध

भाषेच्या उद्‌गमाच्या दृष्टीने पाहता अभ्यासाच्या सोयीसाठी भाषाशास्त्रवेत्त्यांनी भाषांचे वर्गीकरण केलेले असून त्यांना विविध वंशीय भाषांमध्ये विभागलेले आहे. त्यापैकी प्रो. बॉप्प ह्या भाषाशास्त्रज्ञानेच प्रथम आर्योद्‌भव भाषांचे विवेचन करून त्यांचा वंश कायम केला. ह्या वंशालाच '**इंडो–युरोपियन**' किंवा '**इंडो–जरमॅनिक**' किंवा '**आर्यन**' असे म्हटले आहे.[१]

मूळ आर्य भाषेच्या आठ शाखा समजल्या गेलेल्या आहेत.

**१) आर्य भारतीय २) अर्मेनियम ३) स्लाव्ह ४) अल्बानियन ५) ग्रीक ६) लॅटिन ७) केल्टिक ८) जरमॅन्टिक.**

यापैकी प्रत्येक शाखेतून निरनिराळ्या उपशाखा दिसतात. मराठी ही भाषा पहिल्या म्हणजे 'आर्य भारतीय शाखेशी संबंध आहे.[२]

'द्राविडी किंवा द्रविडीयन' हाही भाषांचा एक प्रमुख वर्ग समजला जातो. ह्या द्राविडी भाषांनी सर्व दक्षिण हिंदुस्थान व्यापलेला आहे. त्यात तामिळ, तेलगु, कानडी व मल्याळी ह्या चार मुख्य भाषा होत. आर्य व द्राविडी अशा दोन्ही भाषासमुहांच्या सिमारेषेवर असणारी मराठी ही एक महत्वाची भाषा होय. तिचा स्वभाव व शरीररचना हृया बाबतीत आर्योद्‌भव परंतु दोन भिन्न वंशाच्या भाषांच्या कैचीत सापडल्यामुळे म्हणा, किंवा तिचा काही अंशी प्रसार एकेकाळी द्राविडी असलेल्या लोकांत झाल्यामुळे म्हणा, तिच्या मूळ आर्योद्‌भव स्वरूपावर कानडी–तेलगुचा फार परिणाम झाला आहे.

सातपुडा पर्वताच्या रांगेने मराठीचा जो प्रसार होत गेला आहे तो सातपुड्याच्या एका रांगेतून, गाविलगडच्या एका रांगेतून पूर्वेकडून वळून, बैतुल आणि सिवनी वगैरे प्रदेशास अर्धवर्तुळाकार वळसा घालून, नागपूर मध्यावर ठेवून, थोडीशी दक्षिणेस तर थोडीशी पूर्वेस व पश्चिमेस वळून, लांजी व वैरागड जवळ गोंडी व तेलगू ह्या भाषांना तो भेटते. पुढे चांद्यापर्यंत (**चन्द्रपूर**) पश्चिमेकडे

---

[१] कुलकर्णी, कृ. पा. मराठी–भाषा, उद्‌गम व विकास, मॉडर्न बुकडेपो, प्रकाशन, पुणे, १९६३ (चतुर्थ आवृत्ती) पृ. २१.

[२] उ. नि. पृ. ६३.

पनगंगेच्या पात्रापात्राने माहूर पावेतो आल्यावर तिथे तिचा व तेलगूचा संबंध तुटतो व दक्षिणेकडे गोदावरीकडे जाऊन नैऋत्य दिशेने वळणावळणाने देगलूर, नंदूर व सोलापूर, विजापूर अशी कृष्णा नदी जवळ आल्यावर कानडीचा संबंध येतो.[1]

## परस्परांवर प्रभाव–

अशा रीतीने भौगोलिक दृष्टया आणि एखाद्या नदीच्या प्रवाह ओघाप्रमाणे मराठी विभागाचा जसा द्राविडी भाषांशी संबंध येतो तसाच यादवकालात मराठीचा द्राविडी भाषांशी व त्यातल्या त्यात कानडी व तेलगु भाषांशी जास्त संबंध आला. ज्या भागात सध्या मराठी भाषा बोलली जाते त्या भागात मराठी भाषेपूर्वी कानडी व तेलगु ह्या भाषा प्रचलित होत्या इतकेच नव्हे तर कुमारीलभट्टाने '**पंचद्राविडात**' तामिळ, तेलगू कानडी ह्या बरोबरच महाराष्ट्र आणि गुजराथ ह्या दोहोंचाही निर्देश केला आहे. हे परिगणन बऱ्याच दृष्टीने भाषिक स्वरुपाचे आहे. अशा रीतीने संबंध अती निकट आल्याने कानडी–तेलगुच्या काही खुणा मराठी भाषेत उमटल्या तर ह्यांत काही नवल नाही.[2]

महाराष्ट्रातील चंद्रपूर जिल्हा हा ह्यापूर्वीच सविस्तर वर्णन केल्याप्रमाणे सिरोंचा तहसीलीकडील भागात तेलगु भाषिक आंध्रप्रदेशाशी आणि हिंदी भाषिक मध्यप्रदेशाशी संलग्न आहे ह्या विभागातच गोंडी भाषिक आदिवासींची फार मोठी जमात अतीप्राचीन काळापासून वास्तव्य करीत आलेली आहे. त्या आदिवासींच्या गोंडी भाषेचा अभ्यास करीत असताना तिचा मराठी, हिंदी आणि तेलगु व कानडी ह्या चारही भाषांशी असलेला संबंध शोधून काढणे हे महत्वाचे ठरते. तिसऱ्या प्रकरणात या दृष्टीने विवेचन केलेले आहे.

## गोंडी आणि माडिया

श्री. जी. ए. ग्रिअर्सन ह्यांनी Linguistic Survey of India ह्या ग्रंथाचा चवथा खंड Munda & Dravidian Languages ह्या वर्गातील भाषांच्या अभ्यासासाठी लिहीलेला असून त्यात गोंडीचा अभ्यास केलेला आहे. गोंडी भाषेला The Principal Dravidian dialect of Northern India असे त्यांनी म्हटले आहे. गोंड स्वतःच्या भाषेला '**कोई**' (Koi) म्हणतात, आणि स्वतःला '**कोया किंवा कोईतूर**' म्हणतात. पण श्री. ग्रिअर्सन ह्यांच्या मते 'चांदा व बस्तर (मध्यप्रदेश) व लगतच्या आंध्रप्रदेशाच्या विभागातील गोंडाच्या उपजमातीचा उल्लेख करण्यासाठी वापरलेला हा शब्द बरोबर नाही. कारण भाषा शास्त्रीय दृष्टया '**कोई**' ही स्वतंत्र बोली नसून गोंडीचेच एक प्रगत रुप आहे.

[1] उ. नि. पृ. ७५

[2] उ. नि. पृ. २२७

आणि तिचे तेलगुशी जास्त साधर्म्य आहे. चन्द्रपूरच्या अरण्यातील टेकड्यांवर राहणारे गोंड लोक '**गट्टू**' किंवा '**माडिया**' वनमानव ह्या नावाने ओळखले जातात. आणि त्यांची, ही भाषा, गोंडी बोलीचीच पोट बोली होय. किंबहुना त्यांच्या मते '**माडिया**' ही '**गोंडीचे**' स्थानिकरित्या बदललेले स्वरूप असून ती लगतच्या तेलगुकडे जास्त झुकलेली आहे.[१]

अरण्यातील पहाडी टेकड्यांच्या विभागात गोंडीचे मूळ स्वरूप जाणवते, नव्हे दिसते, तर सखल पठाराच्या भागात भोवतालच्या आर्यन भाषांचा तिच्यावर जास्त प्रभाव आढळतो.[२] गोंडवन किंवा गोंडांच्या वस्तीचा प्रमुख भाग म्हणजे विदर्भ आणि मध्यप्रदेशातील पठाराचा प्रदेश किंवा आणखी स्पष्ट करावयाचे झाल्यास, पश्चिमेस वर्ध्यापासून पूर्वेस बालाघाट आणि उत्तरेस मंडल्यापावेतो, आणि बस्तर ते चन्द्रपूर आणि तेथून दक्षिणेस आन्ध्र–प्रदेशाच्या तेलगु बोलणाऱ्या भागापासून, विशाखापट्टन ते हैद्राबात असा हा पट्टा पसरलेला आहे. यातील प्रत्येक क्षेत्रात गोंडीचा विभिन्न भाषांशी संबंध येतो. बस्तर विभागातून पश्चिमेस चन्द्रपूर विभागात आल्यावर माडिया आणि गोंडी दोन्ही बोलण्यात प्रचलित दिसतात, मात्र वैनगंगेच्या उत्तरेला जास्त प्रमाणात रुढ झालेल्या आढळतात.

अशा प्रकारे गोंडीचा मराठी आणि हिंदी ह्यांच्याशी बराच संपर्क आल्यामुळे आणि ती मूळ तेलगु आणि कानडी हया दोन्ही भाषांच्या अत्यंत निकटची असल्यामुळे माडिया गोंडांच्या माडिया बोलीवर हिंदी मराठीची छाप फार मोठ्या प्रमाणावर आढळते. तिची स्वतःची ठेवण व वांशिक प्रकृती ही तेलगुच्या जवळची भासते. हयापूर्वीच विवेचन केल्याप्रमाणे मराठीच्या आर्योद्भव स्वरुपावर कानडीचा-तेलगुचा परिणाम बराच झालेला आहे हे आपण पाहिलेलेच आहे. गोंडीमुळे मात्र आर्योद्भव मराठी व द्राविडोद्भव तेलगु हया दोघींनाही प्रामुख्याने चंद्रपूर जिल्हयातील भाषांच्या बाबत एकत्रित आणलेले आढळते.

## भाषा की बोली ?

माडिया-गोंडी ही पोट भाषा की बोली हाही एक महत्वाचा प्रश्न हया संदर्भात उद्भवतो. भाषेत व्यक्तिचे व्यक्तिमत्व तर उमटतेच परंतु ते, समाजाचा जो एक मोठा ठसा तिच्यावर उमटतो, त्यापुढे टिकत नाही. भाषेवर उमटणाऱ्या हया मोठ्या ठशाला पोटभाषा म्हणतात.[३] पोटभाषा ही सुद्धा समाजातील एका

[१] Grierson G. A. 'Linguistic Survey of India,' Vol. IV. 1967, Motilal & Banarasidas, **Munda & Dravibian Languages, P. 472**

[२] ग्रीअर्सन जी. ए. उ. नि. पृ. ४७३

[३] उ. नि. पृ. ५७

घटकाचीच बोलभाषा असते. मराठी संबंधी बोलताना वऱ्हाडी, कोंकणी, खानदेशी ह्या बोलभाषा '**पोटभाषा**' संबोधण्यात येतात. पोटभाषेत गोंडी आणि माडिया ह्यांचा परस्पर संबंध पाहत असतांना गोंड आणि माडिया गोंड ह्या दोन भिन्न जमाती नसून एकाच वंशातील उपजाती होत हे लक्षात घेणे आवश्यक आहे. मानवशास्त्राच्या संदर्भातील पुरावा पाहता त्यांचे वांशिक मूळ, देवदेवता, धार्मिक कथा व कल्पना आणि गोत्रपद्धती ही एकसारखीच असून चन्द्रपूर जिल्हयातील सिरोंचा तहसीलीतील माडियांची बोलभाषा गोंडीपासून प्रामुख्याने उच्चारपद्धती व त्यातील विशिष्ट लकबी उदा. हेल आणि शेजारच्या भाषांच्या झालेल्या प्रभावातील कमी जास्त फरक यामुळेच भिन्न वाटतात असेही मत तज्ञमंडळींनी मांडलेले आहे.[१] गोंड ह्याचा अर्थ '**जंगल**' असा होतो. '**कोंड**' ह्या तेलगु शब्दाचा अर्थ पहाड असा होतो. त्याचाच अपभ्रंश होऊन गोंड हे नांव पहाडी प्रदेशात रहणाऱ्या लोकाना मिळाले असावे अशीही एक उपपत्ति लावण्यात येते. त्याच-प्रमाणे '**गो**' म्हणजे अरण्य आणि '**अंड**' म्हणजे उत्पत्तीस्थान, म्हणजे वनवासी असा अर्थ निघतो. ह्या विशाल गोंड जमातीपैकी जे वर्षानुवर्ष अरण्यात राहिले ते '**माडिया**' माड = झाडी किंवा अरण्य = वनमानव होत. वंशनामाच्या व्युत्पत्ती विश्लेषणातूनही वरील उपपत्तीला दुजोरा मिळतो स्थानपरत्वे आढळणारे भेद मात्र नजरेस पडतात.

## 'बोली' चे स्वरुप

ह्या बरोबरच बोलीसंबंधीही विचार करणे आवश्यक आहे. सामान्यतः पोटभाषेचाच उल्लेख '**बोली**' म्हणून करतात कारण ती एखाद्या भाषेची '**बोलभाषा**' म्हणूनच वापरात असते. परंतु आदिवासींच्या बोलीचा विचार करताना लक्षात घ्यावयाचा महत्वाचा घटक म्हणजे त्या खऱ्या अर्थी केवळ बोलीच असतात (**श्रुतिरूप**) कारण त्यांना लिपी नाही. या अर्थी पोटभाषा आणि बोली ह्यामधील हा प्रमुख फरक आहे. पोटभाषेला तिची जी मूळ भाषा असते तिची लिपी असते. उदा० वऱ्हाडी, परंतु गोंडीसारखी बोली ही एक स्वतंत्र व्यक्तिमत्व असलेली भाषा असून तिला लिपी नसल्यामुळे बोलीचेच स्वरूप राहिले. काही पोटभाषांपेक्षा ती समृद्ध असली तरी तिचा बोली म्हणूनच उल्लेख करावा लागेल आणि ह्या गोंडीची विभागीय किंवा स्थानिक बदलामुळे झालेली पोटबोली म्हणजे '**माडिया**'. बोलीचा अभ्यास करताना विशिष्ट भौगोलिक क्षेत्र त्या बोलीतील शब्द, वाक्प्रचार, म्हणी, लोकगीते, लोककथा ही अभ्यासाची मुख्य

---

[१] Deogaonkar, S. G: (Ed) Problems of Development of Tribal Areas, Leeladevi Publications, Delhi, 1980, pp. 171–173.

साधने होत. तसेच तिच्यात रूढ असलेले ध्वनी, त्यांचे उच्चार व उच्चारातील त्यांच्या विशिष्ट लकबी ही देखील अभ्यासाची साधने होत. तसेच शब्दसंग्रह, व्याकरण ह्यांचा देखील अभ्यास करणे आवश्यक आहे.[1]

## लिपीचा अभाव–

गोंडी भाषेला लिपी नाही आणि त्यामुळेच सामाजिक, धार्मिक, सांस्कृतिक इ. सर्व प्रकारचे साहित्य गेय स्वरुपात परंपरागत पद्धतीने चालत आलेले आढळते. नवोदित आदिवासी व प्रामुख्याने गोंडी साहित्यिक किंवा युवक अभ्यासकांनी मात्र गोंडीला लिपी होती असा दावा मांडलेला आहे. भाषेच्या कसोटीला लिपीचा जो प्रश्न उपस्थित होतो त्या बद्दल लिहीताना मुंबईचे युवक अभ्यासक श्री. भुजंग मेश्राम हे लिहीतात– 'गोंडी भाषेच्या लिपी संदर्भात गोंडी–भाषिकाची फार मोठी फसवणूक झालेली आहे. गोंडीला लिपी आहे असे डॉ. ख्रिस्तॉफ व्हॉन फ्यूरर–हायमेन्डॉर्फ, हिरालाल रसेल, एल्विन जनरल कनिगहॅम, जी. एस. घुरिये व सोहनलाल चुडामणी इ. प्रभृतींचे स्पष्ट मत आहे. डॉ. हायमेन्डॉर्फनी तर आपल्या Adivasis of Andhra Pradesh आणि The Rajgonds of Adilabad District' ह्या ग्रंथात गोंडी लिपीविषयी सचित्र विवेचन केलेले आहे. गोंडी ही द्राविडी परिवारी भाषा असल्याने तिची लिपी जवळपास कन्नड किंवा तेलगु–तामिळसारखी आहे[2] '**गोंडी संस्कृतीच्या विरोधकांनी ती लिपी नष्ट केली काय** ?' असाही प्रश्न त्यांनी उपस्थित केलेला आढळतो. प्रो. हायमेन्डॉर्फ ह्यांच्या 'The Gonds of Andhra Pradesh' ह्या १९७९ साली प्रकाशित झालेल्या पुस्तकात मात्र गोंडीला लिपी असल्याचा कुठेच उल्लेख आढळत नाही, उलट त्यात बऱ्याच मोठ्या प्रमाणात गोंडी गीते आणि कथा इंग्रजी मुळाक्षरांचाच अवलंब करुन दिलेल्या आहेत. त्या पुस्तकात लेखक म्हणतात, 'All Gond tradition is oral .....guardian of the sacred lore are the hereditory bards, the Pardhans & Totis...it is largely the manner of recitation by principal bard and his two assistants which must be held responsible for their successful transmission from father to son.[3]

---

[1] कुळकर्णी, कृ. पां. मराठी भाषा उद्गम व विकास, पृ. ६०–६१

[2] मेश्राम, भुजंग गोंडी भाषेचे भवितव्य, **दैनिक लोकमत**, नागपूर, दि. ३–२–१९८० साहित्य जत्रा–रविवार पुरवणी, पृ. ७.

[3] Furer–Haimendorf, C. Von. The Gonds of Andhra–Pradesh, Vikas Publishing House, Pvt. Ltd., New Delhi, 1979 p. 179

१९७८–७९ मध्ये विद्यापीठ अनुदान मंडळाच्या सहाय्याने झालेल्या आदिवासी प्रश्नांवरील एका चर्चासत्रात गोंडीला लिपी उपलब्ध करुन देण्याबाबत एक शोधनिबंध वाचण्यात आलेला होता. त्यावेळी अध्यक्षस्थानी प्रो. हायमेन्डॉर्फ स्वतःच होते. चर्चेच्या वेळी गोंडीला लिपी असल्याचा कोणताही उल्लेख प्रा. हायमेन्डॉर्फ ह्यांनी केला नाही. उलट देवानागरी लिपीचा वापर करून गोंडीतील वाङ्मय लिखित स्वरुपात प्रकाशात आणावे असे त्यांनी प्रतिपादन केले [१] रे. एस. बी. पटवर्धन ह्यांनी १९३५ साली लिहिलेल्या First Gondi Mannual,' मध्येही गोंडीला लिखित स्वरुप नसल्याचे स्पष्टपणे म्हटले आहे. [२] गोंडीला एकेकाळी चित्र–लिपी होती असेही काहींच्या मते सांगण्यात येते. अशा प्रकारे लिपी संबंधीचा मुद्दा जरी विवाद्य असला तरी वस्तुस्थिती ही आहे की, गोंडीला आज लिपी नाही. अर्थातच माडिया–गोंडोलाही लिपी नाही. तिचे स्वरूप फक्त '**श्रुत**' आहे.

## भाषा म्हणविण्यासाठी आवश्यक घटक–

फक्त लिपी नसली तरी या बोलीला '**रचना**' (Structure) असून व्याकरण आहे. इतर भाषांच्या संस्काराने समृद्ध होऊन विकास करून घेण्याची पात्रता आहे.

माडिया–गोंडीला व्याकरण आहे काय ? असा प्रश्न विचारल्यास तिला व्याकरण आहे असे संशोधनाअंती लक्षात येते. गोंडी व माडिया–गोंडी ह्या दोन्हीचे व्याकरण एकच असून त्यावर काही सर्वसामान्य निष्कर्ष काढण्याचा प्रयत्न करण्यात आलेला आहे.

१) मराठी व गोंडी वाक्य रचनेत बरेच साधर्म्य आहे. प्रथम कर्ता नंतर कर्म आणि शेवटी क्रियापद असा क्रम आढळतो.

उदा. इदु वेडगा मरा आंदु
हे धावड्याचे झाड आहे.
कर्ता कर्म क्रियापद

२) या भाषेत पुल्लिंग आणि स्त्रीलिंग असा दोनचाच वापर जास्त आढळतो. नपुंसकलिंग असले तरी त्याचा वापर फारच क्वचित होतो.

---

[१] Deogaokar S. G. (Ed) Problems of Developmenc of Tribal Areas p. 171

[२] Patwardhan, S. B. First Gondi Mannual London Society for Promoting Christian Knowledge London, 1935, pp. 6-7

३) कधी–कधी लिंगाप्रमाणे शब्द पूर्ण बदलतो.

४) जनावरांचा उल्लेख आणि अचेतन वस्तूबद्दल स्त्रीलिंगच वापरण्यात येते.

४) एकवचन आणि अनेकवचनांचा वापर आढळतो.

६) विभक्तिप्रत्यय अष्टमी पावेतो दिसतात. संबोधनाचा वापर विशेष आढळतो.

७) विशेषणे फार थोडी असून ज्या नामांबद्दल ते माहिती देतात त्यांच्या आधीचीच विशेषणाची जागा वाक्यात असते. क्वचितच ते नामाच्या पुढे येते.

८) क्रियापदासंबंधी, चाकोरीत न बसणारी व चमत्कारीक रुपे अनेक आदिवासी बोलीभाषात आढळतात व तसेच माडियाच्याही बाबतीत आहे. त्यामुळे क्रियापदाचे स्वरूप क्लिष्ट बनते. उदा० कृतीदर्शक अशा कोणत्याही शब्दास '**ना**' हा प्रत्यय लावला की क्रियापद बनते.

९) '**तान्**' हा प्रत्यय लावला की भूतकाळ बनतो आणि प्र. पुरुषी मूळ क्रियापदाला '**कान्**' किंवा '**काना**' हा प्रत्यय लावला की साधा भविष्यकाळ बनतो. द्वितीय पुरुषी क्रियापदाला '**मिट्**' प्रत्यय लागतो. मात्र तृतीय पुरुषी क्रियापदाला '**क**' निघून जाऊन '**न**' हा प्रत्यय लागतो.

पुढे सविस्तर चर्चिलेल्या व्याकरण विषयक माहितीवरून असे लक्षात येईल की माडिया गोंडीला व्याकरण आहे. अर्थात गोंड जमात, केवळ मातृभाषा म्हणून आपली भाषा आत्मसात करते आणि त्यांची भाषा आज पावेतो कोणत्याही अभ्यासक्रमाचा किंवा पद्धतशीर अभ्यासाचा भाग नसल्यामुळे गोंड स्वत:च्या भाषेच्या व्याकरणाबद्दल फारसे जाणीवपूर्वक विचार करीत नाहीत. केवळ हौशी अभ्यासकांनी अशा प्रकारचे प्रयत्न केलेले दिसतात. प्राथमिक शाळेच्या इतकेच नव्हे तर महाविद्यालयाच्याही स्तराला ह्या भाषेचा अभ्यास सुरू करण्याचे प्रयत्न सुरू आहेत.

# प्रकरण दुसरे

## माडिया-गोंडीचा भाषिक उगम व इतर भाषांचा परिणाम भाषिक वंश.

भाषेच्या दृष्टीने विचार करता भारतातील आदिवासी जमातीमध्ये विविधत्व आढळते. भारताच्या दक्षिण विभागातील आदिवासी द्रविड भाषिक आहेत. इ. स. पूर्वी ३५०० या कालात द्रविड लोक भारतात आले. त्यांच्या बरोबर ही भाषा भारतात आली. मेडिटरेनियन व डिनारिक वंशाचे लोक द्रविड भाषा बोलतात. [1]

द्राविडी भाषामधील आदिम जाती समाज हा असंपन्न भाषिक गटात मोडतो. तामिळ, मळयालम्, कन्नड व तेलगु ह्या संपन्न द्राविडी भाषा असल्याने त्यांच्याच आसपास वावरणारा हा आदिम समाज त्या भाषांचेच सहाय्य घेतो. उदा. काही गोंड लोकांनी तेलगु भाषेचा स्विकार केला तर काहींच्या भाषेवर हिंदी मराठीचा पगडा दिसतो. [2]

## भाषेची उत्पत्ति

भाषा ह्या शब्दात मूळ शब्द '**भाष्**' म्हणजे '**आवाज उत्पन्न करणे**' हा आहे प्राणी नैसर्गिक प्रेरणेने आवाज उत्पन्न करतात.

त्या आवाजाला किंवा ध्वनीला संकेत निर्माण होतो. परंतु मनुष्य हाच एक प्राणी असा आहे की, ध्वनीला अर्थ देणे व त्याचा क्रम देणे ह्या गोष्टी त्याला साध्य झाल्यात, ध्वनीला पुरेसा अर्थ देण्यापूर्वी हात, डोळे, तोंड इ. च्या हालचाली वा खुणा ह्यांची जोड देऊन प्रगल्भ भाषेच्या उणीवा भरून काढण्यात येतात. आदिमानव अशा प्रकारेच वैचारिक देवघेव करीत असे. आदिवासींमध्ये फार मोठ्या प्रमाणात असलेल्या गोंडी भाषा बोलणाऱ्या समुहाला ह्या प्रक्रियेतून जावे लागले हे निश्चित. तरीपण दक्षिणेतील समृद्ध तेलगू कन्नड, इ. भाषांमधून शब्द–भांडार किंवा शब्द व्युत्पत्ति गोंडीने मोठ्या प्रमाणात घेतलेली असावी असे दिसते. म्हणून गोंडीचे भाषिक मूळ पाहात असताना आदिमांचे पूर्वापार चालत आलेले ध्वनीसंकेत आणि ज्यांच्याशी भाषिक देवाणघेवाणीचे संबंध आले, त्यांचे भाषिक

---

[1] नाडगोंडे, गुरूनाथ 'भारतीय आदिवासी' कॉन्टीनेंटल प्रकाशन, पुणे १९७९, पृ. ३०५

[2] उ. नि., पृ. ३०५

अनुकरण ह्या दोन्ही गोष्टी विचारात घ्याव्या लागतील. पर्यायाने गोंडीने भाषिक मूळ ऐतिहासिक दृष्टिकोनातून पाहावे लागेल. त्यामध्ये द्राविडी भाषांचा वर्ग हा महत्वाचा ठरतो.

## माडियाचा भाषिक उगम-

माडिया-गोंडीचा विचार करीत असताना ज्या गोंडी भाषेची ती पोट बोली आहे, त्या गोंडीच्या उगमाबरोबरच; माडियांच्या भौगोलिक निवासस्थाना-मुळे हिंदी व मराठी भाषांचा संपर्क तिच्याशी आला, त्यामुळे माडियावर जो प्रभावर पडला, तोही पाहणे आवश्यक आहे. इतकेच नव्हे तर, इंग्रजीसारख्या भाषेचा प्रभाव आढळतो. अशा प्रकारे माडियाने गोंडीतून घेतलेल्या शब्दसंचायात सतत वृद्धि होत गेलेली आढळते.[1]

परंतु माडियाच्या भाषिक मुळाचा विचार करीत असताना तो शब्द भाषेत स्वीकारला जाऊन रूढ होईपावेतो त्या शब्दाच्या मुळाशी असलेल्या संकल्पनेचा (Concept) विचार करणे आवश्यक आहे. त्या दृष्टीने पाहता दुसऱ्या भाषेतील एखादा शब्द स्वीकारीत असता संस्कृती-संयोगही होत असतो. म्हणजे त्या जन-समूहाचा विकास होत असतो. उदा. – त्या विभागात जे फळझाड किंवा भाजी पूर्वी नव्हती ती बाहेरुन परभाषियांनी आणून लावल्यावर, आणि त्या गोष्टीचा त्या भागात प्रसार झाल्यावर त्या झाडाचा किंवा भाजीचा परभाषेतील शब्दच रूढ होणार, आणि तो भाषेत सर्वसंमत होऊन एकजीव होऊन जाणार हे निश्चित असते. वस्तू-विनिमयाच्या प्राथमिक अवस्थेत वावरणारे माडिया रुपये किंवा पैसे कधीच वापरत नसत. त्यामुळे साहजिकच '**रुपया-पैसा**' हे शब्द त्यांनी जसेच्या-तसेच आपल्या भाषेत घेतले आणि रुजविले. म्हणून माडियाच्या भाषिक उगमाकडे पाहता प्रथम प्राणी सुलभ ध्वनी-संकेत, नैसर्गिक दृष्टया सतत वाढणारी अर्थपूर्ण संकेतांची गरज, सांस्कृतिक संबंधातून परभाषांशी संबंध आणि त्यांच्यातील शब्दांचे अनुकरण, कालांतराने अशा शब्दांचे जसेच्या तसेच किंवा थोडया फार फरकाने आत्मभाषेत सामिलीकरण, व त्यातून सांस्कृतिक देवघेवीची वृद्धी, असा भाषिक उगमाचा इतिहास आढळतो.

## समाजाची परिपूर्ण ओळख भाषेच्या माध्यमातून :

समाज जीवनाचा अभ्यास म्हणजे '**समाजसेवर्यांचा अभ्यास**.' भाषा ही एक सामाजिक परंपरा आहे. किंबहुना एक सामाजिक वारसा आहे. समाजातील अंतर्गत, बहिर्गत, वैचारिक, स्वाभाविक अशा अनेक परिवर्तनांचे प्रतिबिंब तिच्यात आपणास आढळते. जीवनातील अनेकविध बाबींचे प्रतिबिंब आपण भाषेद्वारे

[1] कुलकर्णी, कृ. पां. 'मराठी भाषा उद्‌गम व विकास'
मॉडर्न बुकडेपो, पुणे, १९६३, चवथी आवृत्ती, पृ. ५४

अनुभवतो, जीवनप्रवाह हा अखंड बदलत असतो हा बदल अतिशय सूक्ष्म असतो व क्वचित असतो. ह्या बदलांचाही अभ्यास करण्यास 'भाषा बोली' हेच माध्यम आपणास अधिक उपयुक्त ठरते.

## भाषची वृद्धी

भाषा ही आत्मप्रगटीकरण वा आत्मनिवेदनाचे साधन आहे. त्याचे माध्यम 'ध्वनी' आहे. ध्वनीच्या सहाय्याने समाजातील इतरांशी विचारविनिमयाचे साधन म्हणजे भाषा, असे आपण म्हणतो. भाषेची वाढ किंवा परिणती त्रिविध प्रकारांनी होते. भाषेतील शब्दांच्या मूळ स्वरुपात कधी कधी बदल होतो. बाह्य-स्वरुप आणि आंतरस्वरुपातही बदल होत असतात.

ध्वनी, ध्वनीसमूह आणि त्यांचे संकेत एका पिढीपासून दुसऱ्या पिढीपावेतो संक्रमित होत असतात. असे संक्रमण चालू असताना त्यात बदलही हात जातात, काही नवे येतात व काही असलेलेच रूढ होत जातात, किंवा जुने नाहीसे सुद्धा होत असतात. ह्या क्रिया सतत चालू असल्यातरी त्यातील बदल आपणास क्वचितच जाणवतात, कारण भाषेचा मूळ साचा (सांगाडा) मात्र ताच कायम असतो. इंद्रियानुभूत प्रत्यक्ष वास्तव व काल्पनिक वस्तुपासून, तो दर्शक ध्वनी अलग करणे, त्यातील काही निवडक अशा बाबी एकत्र करणे, त्या किंवा त्याचे संकेत करणे हा मूळ साचा होय. भाषा एकदा पूणपणे आत्मसात होईपर्यंत हे चालते. त्यानंतर मग त्यात नवनविन शोध, संशोधन, ज्ञान व कला ह्यांची भर पडत जाते. त्यातूनच भाषांचे निरनिराळे प्रकार व वंश निर्माण झाले, कारण एका मानवसघाची भाषा व तिला लागू होणारा नियम हा इतरही मानवसघ ला लागू झाला व भौगोलिक निर्बन्धानेच त्या विखुरल्या गेल्या.[1]

## द्राविड-भाषा परिवरात गोंडीचे स्थान :

उच्चाराची पद्धत, वाक्यरचना व काही शब्दांचे साधर्म्य अशा गोष्टींमुळे आदिवासी भाषा त्या एकमेकींना जवळच्या वाटत असल्या तरी त्यामुळे एका भाषेतून दुसरी भाषा निर्माण झाली की काय? असा सभ्रम पडण्याचे कारण नाही पेंगो, कोंडा, कुर्वा, कुई, मुंडा ह्या व बस्तरपट्टीत बोलली जाणारी गोंडी भाषा जवळच्या असाव्यात असे वाटते.[2]

ह्या गटातील, संख्येने सर्वात जास्त लोकांची भाष 'गोंडी' आहे. ती मध्यप्रदेश, आंध्रप्रदेश, महाराष्ट्रात बोलली जाते. महाराष्ट्रात चन्द्रपूर यवत-

---

[1] Joshua Whatmough 'Language- A Modern Synthesis, Ch. X; P. 170.

[2] कुळकर्णी सु. बा. उ. नि. पृ. ३८

माळ व अमरावती ह्या जिल्ह्यात गोंडांच वस्ती केन्द्रीत झालेली दिसते हिच्या माडिया, मुरिया व राजगोंडी बोली आहेत.[1]

ग्रिअर्सनने माडियांच्या बाबतीत, 'So Called Mari' असा उल्लेख करून माडिया हे जंगलात राहणारे गोंडच आहेत व त्यांच्यात व त्यांच्या बोलीत काहीही फरक नाही असे मत प्रतिपादले आहे.[2]

रे एस. हिस्लॉप ह्यांनी सुद्धा '**मरा = झाड**', म्हणून जंगली भागात राहणारे ते गोंड, त्यांची भाषा म्हणजेच गोंडी भाषा, त्यामुळे माडिया व गोंड हे एकच आहेत, असे मत मांडले आहे.[3]

प्रख्यात प्रशासक आणि मानववंशशास्त्रज्ञ श्री. ब्रह्मदेव शर्मा ह्यांच्या मते बस्तर विभागातील '**अभुजमाडिया**' ह्या जमातीतील मध्यप्रदेश व महाराष्ट्राच्या सरहद्दीवरील टेकड्या ओलांडून आलेली एक शाखा–म्हणजेच माडिया होत.[4]

माडिया-गोंडांच्या बोलीतील शब्दांचा भाषिक दृष्टीकोनातून विचार केल्यास द्राविड परिवारातील कन्नड व तेलगू आणि लगतच्या भागात बोलली जाणारी मराठी व हिंदी ह्यांचा बऱ्याच मोठ्या प्रमाणात प्रभाव आढळतो इतकेच नव्हे तर ब्रिटीशांच्या काळापासून इंग्रजी भाषेशी संपर्क असल्यामुळे माडियांनी आपल्या बोलीत अनेक इंग्रजी शब्द समाविष्ट करून घेतले आहेत. पुढे दिलेल्या शब्दांच्या तुलनात्मक संग्रहावरून ह्या भाषिक देवाण–घेवाणीची व व त्याचप्रमाणे माडियांच्या बोलीच्या उगमस्थानाची आपणास कल्पना येते.

## इतर भाषांचा परिणाम

पुढे दिलेल्या शब्द–सूचीमध्ये व्यवहारात सर्वसाधारणपणे प्रचलीत असलेले शब्द घेतलेले आहेत. त्यात इंग्रजी, मराठी, हिंदी, तेलगू व कन्नड ह्या आणि इतर भाषा ह्यातील शब्दांशी साधर्म्य दाखविण्यात आलेले आहे.

---

1. कुळकर्णी सु. बा. उ. नि. पृ. ३८
2. Griersan G. A. Linguistic Survey of India Vol. IV. 1967, p. 534
3. Grierson G. A. "Linguistic Survey of India," Vol. IV (Munda & Dravidian Languages), Motilal Banarsidas, 1967, p. 534.
4. शर्मा, ब्रह्मदेव डॉ. एस. जी. देवगावकर ह्यांना ह्याबाबत आलेले पत्र, नवी दिल्ली, दि. २८ डिसेंबर १९७४.

## संख्यावाचक शब्द :-

साधर्म्य दर्शक चिन्ह "

| माडियातील शब्द | मराठीतील प्रतिशब्द | साधर्म्य: मराठी | हिन्दी | तेलगु | कन्नड | इतर. |
|---|---|---|---|---|---|---|
| वडगा | अर्धा | | | " | | |
| उंदी | एक | | | " | | |
| रेंडु | दोन | | | " | | |
| मूडू | तीन | | | " | | |
| नाल् | चार | | | " | | |
| हेय्यु् / सियु | पाच | | | " | | |
| सहा | सहा | " | | | | |
| सात | सात | " | | | | |
| आठ | आठ | " | | | | |
| नऊ | नऊ | " | | | | |
| दहा | दहा | " | | | | |
| अकरा | अकरा | " | | | | |
| बारा | बारा | " | | | | |
| तेरा | तेरा | " | | | | |
| चौदा | चौदा | " | | | | |
| पंधरा | पंधरा | " | | | | |
| सोरा | सोळा | " | | | | |
| सतरा | सतरा | " | | | | |
| अठरा | अठरा | " | | | | |
| ऊंदोकमी–बिसा– | एकोणवीस | " | | " | | |
| वीसा | वीस | " | | | | |
| वीसाऊंदी | एकवीस | " | | " | | |
| वीसाहेंयु | पंचवीस | " | | " | | |
| वीसदहा | तीस | " | | | | |
| वीसापंधरा | पसतीस | " | | | | |
| रडुवीसा | चाळीस | " | | " | | |
| रेंडुवीसादहा | पन्नास | " | | " | | |
| मुडुवीसा | साठ | " | | " | | |
| मुडुवीसादहा | सत्तर | " | | " | | |

| माडिया | मराठीत | साधर्म्य | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | अर्थ | मराठी | हिंदी | तेलगु | कन्नड | इतर |
| नालुवीसा | ऐंशी | " | | ' | | |
| नालुवीसादहा | नव्वद | " | | " | | |
| ऊंदीकमी शंभर | नव्याणव | " | | " | | |
| शंभर/नूर | शंभर | " | | | | |
| सहावीसा | एकशेवीस | " | | | | |
| हजारु | हजार | " | | | | |

माडिया बोलीतील वरील अंकवाचक शब्दांकडे पाहिल्यानंतर हे स्पष्टपणे लक्षात येते की पाच पर्यंतचे शब्द तेलगु भाषेतील आहेत, नंतरचे वीसपर्यंत मराठीतून घेतलेले आहेत. फक्त '**सोळा**' साठी '**सोरा**' हा शब्द आहे. चंद्रपूर' जिल्ह्यात अनेक मराठी भाषिकांच्या तोंडीही '**ळ**' चा '**र**' होतो. उदा '**नळ** ऐवजी '**नर**' हा शब्द उच्चारतात. म्हणजे '**सोरा**' हा शब्द मराठीच समजायला हरकत नाही. वीसच्या पुढे खरे म्हणजे स्वतंत्र शब्द नाहीत. वीसच्या आधीच्या अंकवाचक शब्दांची बेरीज वजाबाकी करून व त्यासाठी तेलगू आणि मराठीतून उद्भवलेल्या अकवाचक शब्दांची सरमिसळ करून उदा. **रेंडु वीसा** (**चाळीस**) शब्द तयार केलेले दिसतात. निष्कर्ष असा की अंकवाचक शब्दांच्या बाबत मराठी व तेलगु ह्या दोन्ही भाषांचा समप्रमाणात प्रभाव पडला आहे.

## सामान्य शब्द

| माडिया | मराठीत | साधर्म्य | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | अर्थ | मराठी | हिंदी | तेलगु | कन्नड | इतर |
| हिल्ले | नाही | | | " | | |
| हिक्के | इकडे | " | | | | |
| हक्के | तिकडे | | | " | | |
| इदरम | असे | | " | | | |
| कम्मी | कमी | " | | | | |
| पक्का | पुष्कळ | | | | " | |
| बहरा | मोठा | | " | | | |
| बेस | चांगला | | | | | इंग्रजी |
| निटम | खरा | " | | | | |
| सिधा | सरळ | | " | | | |
| वाकडा | वाकडा | " | | | | |

| माडिया | मराठीत अर्थ | साधर्म्य मराठी | हिंदी | तेलगु | कन्नड | इतर |
|---|---|---|---|---|---|---|
| मिठासी | गोड | | ,, | | | |
| मनकल } मानवल } | माणूस | ,, | | | | |
| पाजे | पाहिजे | ,, | | | | |
| जगड्म | भांडण | ,, | ,, | | | |
| कव्वड | काम | ,, | | | | |
| फावड | फावडे | ,, | | | | |
| बोंदा | बोडी, खड्डा | ,, | | | | |
| सत्तुम | खत | ,, | | | | |
| खाचुर | बेलगाडी | ,, | | | | |
| आवस | अमावस्या | ,, | | | | |
| कुही 'सुवा | विहीर | | ,, | | | |
| वखतुन | वेळेवर | | ,, | | | |
| डगुर | मोठे | ,, | | | | |
| चोखट | चांगले | ,, | | | | |
| इटूर | विटाळ | ,, | | | | |
| दिनम् | दिवस | ,, | | | | |
| पूजा | पूजा | ,, | | ,, | | |
| मठम् | देऊळ | ,, | | | | |
| नोकर | नौकर | ,, | | | | |
| पोलीस | पोलीस | ,, | | | | इंग्रजी |
| मास्तर | मास्तर | ,, | | | | |
| पंचायत | पंचायत | ,, | | | | |
| मिरची | मिरची | ,, | | | | |
| सकरे | सकाळी | ,, | | | | |
| सकरी | साखळी | ,, | | | | |
| मोटर | मोटार | ,, | | | | इंग्रजी |
| वरसांग | वर्ष | ,, | | | | |
| सावकार | सावकार | ,, | | | | |
| सरपंच | सरपंच | ,, | | | | |
| सेंटर | केन्द्र | ,, | | | | इंग्रजी |
| सोबत्याल | मित्र | ,, | | | | |
| सोंग | वेश | ,, | | | | |
| हाटुम | बाजार | ,, | | | | |

| माडिया | मराठीत अर्थ | साधर्म्य | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | मराठी | हिंदी | तेलगु | कन्नड | इतर |
| ढोल | ढोल | " | | | | |
| नकाशा | नकाशा | " | | | | |
| खटुल | खाट | | | " | | |
| दिया | सूर्य किंवा दिवसाची वेळ | | " | | | |
| मार्ग | मार्ग | " | | | | |
| चिकल | चिखल | " | | | | |
| चिटी | चिठ्ठी | " | | | | |
| साकरी | साखरी | " | | | | |
| ठाव | माहीत आहे. | " | | | | |
| जवान | शिपाई | " | " | | | |
| बांडदरी | सरहद्द | | | | | इंग्रजी |
| गार्ड | गार्ड | | | | | इंग्रजी |
| फॉरेस्ट | जंगल | | | | | इंग्रजी |
| दफेदार | फोरेस्टर | | | | | |
| खेत | शेत | | " | | | |
| फुकट | फुकट | " | | | | |
| तालम | कुलूप | | " | | | |
| बिमारी | आजार | | " | | | |
| शितुडा | थंड | " | | | | संस्कृत |
| हुडकसी | शोधतो | " | | | | |
| गोलेम | घमेला | | " | | | |
| दंडी | धानशेती | " | | | | |
| बांध | बांध | " | | | | |
| गोहुकू | गहू | " | | | | |
| साप | सफा | " | | | | |
| सितामरा | सिताफळीचे झाड, | सिता | | | मरा | |
| शितामरा | शेवंतीचे झाड, | शिता | | | मरा | |
| कागुद | कागद | " | | | | |
| गोष्टींग | गोष्टी | " | | | | |
| कोस | कोस | " | | | | |

| माडिया | मराठीत अर्थ | साधर्म्य | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | मराठी | हिंदी | तेलगु | कन्नड | इतर |
| विज्जा | बी | " | " | | | |
| वेली | वेल | " | | | | |
| नारियल | नारळ | | " | | | |
| कपडो | धोती | " | " | | | |
| थाली | लोटा | " | | | | |
| काया | कच्चे फळ | | | | " | |
| भेल्ली | गूळ | " | | | | |
| कारीयल | काळा | " | | | | |
| पांडरी | पांढरा | " | | | | |
| हेरे | बकरी | " | | | | |
| बाबो | बाप | " | | | | |
| काका | काका | " | | | | |
| मामा | मामा | " | | " | | |
| मामी | मामी | " | | " | | |
| आतो | आत्या | " | | | " | |
| मुईंतो/मातरल | म्हातारा | " | | | | |
| मुका | मुका | " | | | | |
| कंदील | कंदील | " | | | | |
| कबुली | स्वीकारणे | " | | | | |
| कपारी | कपाळ | " | | | | |
| कुली | हमाल/मजूर | | | | | इंग्रजी |
| गंटा | घंटा | " | | | गंटे | |
| जल्दी | लवकर | | | " | | |
| जमा | गोळा | | " | | | |
| जिंकना | जिंकणे | " | | | | |
| दंडा | हाताचा दंड | " | | | | |
| धंदा | व्यवसाय | " | | | | |
| पिसाल | पागल | " | | | | |
| पुजारी | पुजारी | " | | | | |
| गादी | (राजाची) सिंहासन | " | | | | |

| माडिया | मराठीत अर्थ | साधर्म्य | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | मराठी | हिंदी | तेलगु | कन्नड | इतर |
| बगिच्या | बाग | " | | | | |
| सांकलाल | सोकारी/ जागल्या | " | | | | |
| इस्कूल | शाळा/शिक्षण | " | | | | इंग्रजी |
| लबार | लबाड | " | | | | |
| सायबल | साहेब | " | | | | इंग्रजी |
| कालू | पाय | | | | " | |
| कयी | हात | | | | " | |
| अक्को | मांठी बहीण | | | | " | |
| कोरु | कोंबडी | | | | " | |
| नेयू | कुत्रा | | | | " | |
| तला | डोके | | | | " | |
| हूबल | वाघ | | | | " | |
| मूंज | माकड | | | | " | |
| मरा | झाड | | | | " | |
| हुडुक | हुडकणे/ शोधणे | | | | " | |
| कलबंडा | मोठा दगड | | | बंडा | कल | |

## सर्वनामे

| | एकवचन | | | अनेकवचन | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | मराठी | माडिया | कन्नड | मराठी | माडिया | कन्नड |
| प्र. पु. | मी | नन्ना | नानु | आम्ही | माटू/मम्मट | नावु |
| द्वि. पु. | तू | निमा/निम्मे | नीनु | तुम्ही | मिटू/मिम्मट | नीवु |
| तृ. पु. | तो | ओगु/वोर, ओर | अवनु | ते | अवे/ओर | अवरु |
| | ती | इदु/अदु | अवळु | त्या | इवू/अवु | अवरु |
| | तें | ओदु/अदु | अदु | त्या | इवू | |

## मराठी अनुवाद –

पहिल्यानी नेलगुंडा त्रासामुंडी गट्टा येथे ठेवला. (मेळावा) त्या नंतर मोठे गाव भामरागड इथे सिनेमा ठेवला. तर चन्द्रपूर अहेरीला लेव्हीसाठी कोणाकोणाला त्रास होऊन राहिला. कोणाला जेल होत आहे. हे बघा, मी तिथे जाऊन तीन दिवस राहिलो बी. डी. ओ. साहेबांनी आणि मेडपल्लीवार साहेबांनी आदिवासी मेळावा आहे म्हणून सरपंचाला सांगितले. व बाबूला सांगितले म्हणून आम्ही आज सरकारी कामासाठी आलो. मेडपल्लीवार साहेब अहेरीला गेले व तिथे सांगून आले मी भामरागड गावात गेलो तर गायता भेटला. आदिवासी मेळावा आहे तर तुम्ही तीन वाजता या म्हणून मी पोलीस पाटलाला पण सांगितले. तर आज या तारखेला येथे सरपंच येणार आणि मिटींग घेणार असे सांगितले. सरपंच आला तर बाबू येत नाही, व बाबू आला तर सरपंच येत नाही. आज आम्ही आदिवासी मेळावा म्हणून आलो. पैसे घेवून गव्हर्मेंट सरकारने कमीत कमी चारशे रुपयांचे जेवण दिले. एक हजार दोन हजार असते तर चांगले जेवण मिळते. आपण दिड दोनशे माणसे मिळून सरपंचाला सांगितले असता बाबू येत नाही. बाबू आला तर सरपंच येत नाही. आणखी एक गोष्ट अशी की प्रत्येक ठिकाणी शाळा असतात. मास्तर आले तर मुले नाहीत मुले आलीतर तर मास्तर नाहीत. हा एरिया नेहमीच मागे आहे. तुम्ही म्हणता आज पंधरा वर्षे झाले तरी अजून सुधारलेला नाही.

वरील उताऱ्यात अनेक इंग्रजी शब्द उच्चारात किंचित फरक करून वापरलेले आहेत. उदा. एरिया – हेरिया, बिडीयो – बी. डी. ओ., तसेच या इंग्रजी शब्दांना माडिया प्रत्ययही लावलेले दिसतात. उदा इस्कूस्कू–स्कूल चे अनेक वचन, किंवा लेवितासाठी–इत्यादी. याशिवाय तारीख, पोलीस, सायबाल, सिनेमा इत्यादी मराठीत रुढ झालेले इंग्रजी शब्द किंवा इतर भाषेतील शब्द बऱ्याच प्रमाणात आहेत. भामरागडचा उच्चार बामरागड असा असून शेवटी 'इ' लावून शब्दोच्चार केलेले आहेत. उदा. सरपंची. वर्षांग या शब्दांला अनेक वाचनात्मक 'इ.' प्रत्यय लावला आहे. त्याच प्रमाणे कमसे कम, अरेक, (हरेक) हे हिंदी शब्दही आढळतात. भामरागड विभाग हिंदी भाषिक विभागाच्या जवळ असल्यामुळे हिंदी शब्दांचा प्रभाव त्या विभागातील माडियांवर मोठ्या प्रमाणावर दिसून येतो. वाक्यरचनेत अनुप्रासात्मक लकब दिसून येते. उदा. सरपंची बातेके बाबू वायो, बाबू वातेके सरपंच वायो.'

## उतारा क्रमांक दोन

## श्री. बिरा वरसू दोगे

भामरागड ब्लॉक मधील तुम्मरगुडा या गावचे हे नेते असून हे भाषण दिले तेव्हा एटापल्ली पंचायत समितीचे सदस्य होते, आज सभापती आहेत.

"..........तरी मती इंजेके सायबाल हित्तोर
तरी पण आता साहेब म्हणतात,

हिंजेक वेहतातोर, वेहवाड मुनकेडेके तो बोना
आता सांगतात, सांगतानाही पुढे तर कुणाचा

आपलीकेसन अनो अस्ता. ग्रामपंचायता सरपंचीकू एरका
ॲप्लीकेशन जात नसतो. ग्रामपंचायतच्या सरपंचाला माहित

हिलोयो ? ग्रामपंचायता बाबूकू एरका हिलोयो ? लोकरकू
नाही का ? ग्रामपंचायतच्या बाबूला माहित नाही का ? लोकांना

वेहतान जबाब बोना ग्रामसेवकना बदे योजना
सांगितले जबाबदारी कोणाची ग्रामसेवकाची अमुक एक योजना

पेसीता जनतातूक वेहताना. ग्रामसेवकबाबू सरपंचीकू माहित
निघते लोकांना सांगणे. ग्रामसेवकबाबू सरपंचाला माहित

लेवेके ग्रामसेवकबाबू अद सरपंचीन केयीसी ग्रामपंचायते
नसेल ग्रामसेवकबाबू ते सरपंचाला बोलावून ग्रामपंचायतमध्ये

मिटींग कियना. लोकूरीकू पूर्ण जाहीर कियना
मिटींग करून (घेवून) लोकांना पूर्ण जाहीर करणे

जाहिरी आतासके बोर मानवाल तेन्दोन !
जाहीर झाल्यानंतर कोण माणूस काढत नाही !

हितेके ताना कुशी वातोर एरे वेने
म्हटल्यास त्याला खुशी असेल तर बकरा पण

पाहजे हिनतोर, वेरु वेले पाहिजे हिंतोर
पाहिजे म्हणतो, हे पण पाहीजे म्हणतो

कोन्दा पाहिजे हिदवेन पाहिजे. अदवेने
बैल पाहिजे हे पाहिजे, ते पण

पाहिजे हिनतोर बिजाय पाहिजे, खत्तुम
पाहिजे म्हणतो. बियाणे पाहिजे खत

पाहिजे, ते अदरिती इंजेके सायबालोर
पाहिजे. तर त्याप्रमाणे आता साहेबलोक

मती बाहकिस्तोर ? ग्रामसेवक लोकूर
पण काय करतील ? ग्रामसेवक लोक

बाहकिस्तोर ? वेर बेद मावा दंधातून
काय करतील ? हे कोणतेही आमचा धंद्याला

बेहोर आणि वेहेची तेली बाबू
सांगत नाही आणि सांगून तरी बाबू

आसतोर. माट वने पंचायत समितीते नना
नसतो. आम्ही पण पंचायत समितीमध्ये मी

पंचायतसमितीते टराव मंजूर कियनोंम. अगा
पंचायतसमितीत ठराव मंजूर करतो. तेथे

मंता जागाते जिल्हापरषधते तो वायलाशी
आहे जागेत जिल्हापरिषदेत तर येण्यासाठी

अडचान असता. आखरी रेन्ड बेरेएहकू
अडचण होते. शेवटी दोन नाले

पोंगीतांग अस्केने बेरा, खत्तुम वेने अस्केने
वाहतात तेंव्हा याचा, खत पण तेंव्हा

ते मोकात हेवोर. अदू गालत तितोर
तर मोक्यात देत नाहीत. ते चुकीचे खातात.

हिंजेके मावा डॉगदर देहतोर गदा मावा
आता आमचा डॉक्टर सांगितलं नं आमचे

मेंबर लोक किस्तोर. तो आद पोलो
मेंबर लोक करतात. तर ते गोष्ट

मट निटोम तासतोम, मती हिगडा टराव
आम्ही खरच ठेवली, पण इथला ठराव

मंजूर वेरु बराक किसोर मंतोर. अग
मंजूर हे कशाला करत आहेत. तिथे

मंजुर आतातुन बोनकु वमकोम हितेक बाताल
मंजुर झालेला कोणाला विकू म्हणजे काय

आवड बाबाल नाक हिन्तोर अन्मु नेन्डु
होईल राजाला मला म्हणतात जा आज

आयो नाडी, नाड आयो. आवरे लड्डु
नाही उद्या, उद्या नाही. आवरे लड्डु

जावरे लड्डू हिनतोर. ग्रामपंचायत सरपंच बाहास
जावरे लड्डू म्हणतात ग्रामपंचायत सरपंच कशावरुन

हटेम आसतोर. पंचायतसमितीतगा वेहताना हितेके
हटतो त्रासतो. पंचायतसमितीमध्ये सांगणे म्हणजे

मूंड दिनांग दायना इतके एटेपाल बेके
तीन दिवस जाणे म्हणजे एटापल्ली कुठे

उंद वेरा अगा हतेके बारममेंड आस्ता
एक वेळ तिथे गेल्यास आठवडा होतो.

मती सरपंचीक मोका अरतेके सरपंचीक तिंदाला
पण सरपंचाला वेळ पडल्यास सरपंचाला खायला

गत्तीवेने दोरको आस्ता. तिंदाला गती दोरको
गती मिळत नसते. खायला गती मिळत

आस्ता. उपास मंतोर अगा सेटपेची कियलासी.
नाही. उपास राहतो. तिथे शक्य नाही करायला.

'आज नही कल आवो' इनतोर 'कल'
आज नही कल आवो' म्हणतात कल

नही परसू सुबे आट बजे देता
नही परसू सुबें आठ बजे देता

हूँ आव बोलता,' ओर हियला
हुँ आव बोलता,' ते द्यायला

खाली हिलेर. सटपिट वेहतापा सटपिट वेहतातोर
तयार नाही. झटपट सांगताना लवकर सांगतात.

ननावेने हियतान प्याह:कयी हियला खाली हिल्लेर.
मीपण देतो नंतर द्यायला खाली नाही.
(तयार)

अदीना पोहोचीसत्तोर, अद बराबरा मती लोकरीकु अद
त्याचा सोडून देतात, ते बरोबर पण लोकांना ते
(फेकून देतात)

अडचान बोना ह्गिा. पोग्व्होट्कू वेर वातल
अडचण कुणाला येते. वरुन हे काय

कियनुर हिगा हितोर माक सायबाकू ओरीक
करतील इथे म्हणतात आम्हाला साहेबांना त्यांना

सायबाल हिका पोग्व्होन मंतोर. बोर इतेके
साहेबाला पण वरून (अधिकारी) आहे. कोण म्हणजे

तानासाठी मिटींग वेहतातोर. सभापतीन पोसवितातोर
त्यासाठी मिटींग सांगतात. सभापतीला घेवून जातात.
(धरून नेतात).

एरे नाहकाने हिद हिकोम अद हिकोम
जवळ गाबात हे देणार, ते देणार,

मतो ओना हियलासी बोनांग केलींग इंजेक
पण त्यांच्याकडून देण्यासाठी कुणाचा फसवणूक आता

डागदरसायबाल हिन्तोर. आठ, नऊ, दहा,
डॉक्टरसाहेबाला म्हणतात. आठ, नऊ, दहा,

तारीकेला खोंदांग वायनुंग हितोर. हिद बामरागडी
तारखेला बैल येणार म्हणतात. इथे भामरागडला

गट्टा जारावंडी एटेपल एवियाला महिनामेंड
गट्टा जारावंडी एटापल्ली पोहोचायला महिनाभर

आस्ता, वेरांग वेहताना नाड गने आतोर
लागतो. याचा सांगणे उद्या परवा गेला

इतेके डागदर निटाम हिदाकन साप महिनामेटा
म्हणजे डॉक्टर खरच म्हणणार. पूर्ण महिनाभरच

अदवन नना हुडसोड महानान. अनहसी हिद्द
ते पण मी पाहत राहतो. आणखी एक हे

ओवियाना पोल्लो कोडिंहिंग तेंडनाडू. चुवाग तेंडनाडू.
पोहोचते गोष्ट खड्डे खोदणे, विहीरी खोदणे,

अदपोलो निटाम मंता मती बाहकिस्तोर
ती–गोष्ट खरच आहे. पण कसं–करायचं

नाक हुडा अिगडा बामरागडदा सरपंची
मला पहा इथचा भामरागडचा सरपंच

अदरिती इंजेके माट मावा उडनासाठी
त्याप्रमाणे आता आम्ही आमचा पाहण्यासाठी

सुवासाठी तगायी तेन्डकड, तळीसाठी तेन्डकड,
विहीरीसाठी तकावी काढू, तलावासाठी काढू,

मती पया बाहकिस्तोर, दहा एकर
पण नंतर काय करतात, दहा एकर

वलीत मंता. रामाना गोमाना हितोर
जास्त आहे. रामाचा गोमाचा म्हणतो

ओसतोर. ओरा बासता आडार हिचोक
देतात. त्याचा येतो ऑर्डर एवढे

क्विटस्कू पन्नास किटल पचीस किटल
क्विटल पन्नास क्विटल पंचवीस क्विटल

नूरा किटल ओवूरवासता, आखरीस ओरकू
शंभर क्विटल मीठ येते. शेवटी त्यांना

इतेके इल्ले. ता–हिम लेवेके हिम,
म्हणजे नाही. आण–दे नसलेतरी दे,

पेसीतोर. सिरवंचरे दायना वायाना, सिरवंचा
निघतात. सिरोंचाला जाणे येणे, सिरोंचा

दायना वायना, मती बसकेन मारो.
जाणे येणे पण कधीच संपत नाही.

बोनासाठी मावा अन्नामतुकु माटे खर्च !
कोणासाठी आमच्या अन्नासाठी आम्ही खर्च !

कुकुम माटे ताकमूळ इनतोर ओकेडोर अब
हुकूम आम्हीच चालतो. म्हणतात. तिकडचे ते

रेन्ड मुंड जिल्हातोर बिल्कूर लेहडे हिलोर
दोन तीन जिल्ह्याचे बिल्कुल अनपढ नाहीत.

ओरा बाताल किस्तोर मावा इकेडा अन्नामतुम
त्यांचा काय करतात आमचा इकडचा अन्न

ओसतोर. बम्बई ते बम्बई सरकारते अब
नेतात. मुंबई तर मुंबई सरकारमध्ये ते

पदींग तिदानांग, जोनांग माट हिके
डूकरं खायचे, ज्वारी आम्ही इकडे

तच तिदाना. मराइर्क तिजोरे, माटींग
आणून खाणे झाडाचे मूळ खाणं, मटारु (कंद)

तिजोरे, माट वेर–बारा मावा अन्नमतूम !
खाणे, आम्ही ह्याना–काय आमचे अन्न !

ओखे ओसमोर अदे अन्नम माक
तिकडे नेतात, तेच अन्न आम्हाला

इके इतेके बार आवाळी ? ओरीख
इकडे दिल्यास काय झालं ? त्यांना

वारा लुचीनांग नुकांग हियना ?
काय लुचईचे तांदूळ द्यायचे ?

या भाषणात विकास कार्यक्रमाची चर्चा असल्याने विकास योजनासंबंधी अनेक शब्द आढळतात. उदा. योजना, ग्रामपंचायत, ग्रामसेवक, बाबू (ग्रामसेवकालाच बाबू संबोधतात), मिटींग, सभापती, जिल्हापरिषद, पंचायतसमिती, सरपंच इ.

तसेच खत्तुम (खत), ठराव, मंजूर, दंधातून (धंद्याला), कुशी (खुशी) डॉक्टर, लुचई (लुचीनांग), = लुचईचे, उपास, पाजे किंवा पाहिजे इत्यादी मराठीतून घेतलेले शब्दही बरेच आहेत. आपलीकेसन = ॲप्लीकेशन, आडार = ऑर्डर सारखे इंग्रजी शब्दही तो वापरतो.

हिंदी शब्द, वाक्य व वाक्प्रचारही वापरलेले दिसतात. लाहेरी कुबाकोडीच्या लगत असलेल्या बस्तर विभागाकडून हा प्रभाव पडलेला असावा. उदा. आखरी, बंबई इ. भामरागडच्या पुढे हिन्दीचा प्रभाव बराच आढळतो. पण त्या शब्दांच्या उच्चारावर मराठीची छाप आढळते. उदा. 'आट बजे देता हूं आव बोलता' ह्या वाक्यातील 'बोलता' ह्या शब्दाचा उच्चार मराठी पद्धतीने केलेला आहे.

काही विशिष्ट विभक्ती प्रत्यय लावलेले दिसतात. उदा. जन्तातुक (जनतेला) लोकुरकू (लोकांना), सरपंचीक् (सरपंचाला), ग्रामपंचायता (ग्रामपंचायतच्या) मोकात (मोक्यावर), पचायत समितीने (पंचायत समितीमध्ये) दंधातून (धंद्याला), जिल्हातोर (जिल्ह्याचे) इ. काही विशेष शब्दही आढळतात.

उदा. सटपिट–झटपट (झ चा स झाला असावा)

प्याहःकयी–नंतर

पोग्व्होन–वरून (वरचे अधिकारी)

महिनामेंड–महिनाभर

वारममेंड–आठवडाभर

तेंडनादु–खोदणे

चुवाग (सुवाग)–विहीरी (कुवॉं या हिन्दी शब्दावरून) इ.

'ह' कार युक्त ध्वनीही आढळतो.

अिगडा = हिगडा = इथला.

ोंदांग = खोदांग = बैल (अ. व)

इत्तेके = हित्तेके = म्हणून इ.

बिलकुल या शब्दाचा वापर करतांना 'बिलकुर' 'ल' चा 'र' तसेच हुकूम' हा शब्द 'कूकूम' (हू च्या जागी कू) असा वापरलेला आहे.

वाक्यरचना फारच परिपूर्ण स्वरुपाची असून अत्यंत प्रभावी आहे. 'ता–हिम' 'आण–दे' असे आज्ञार्थक प्रयोग अनुप्रासात्मक शब्द किंवा वाक्य खंड आढळतात.

विकास प्रक्रियेचा प्रभाव म्हणून बोलीत अनेक नवीन शब्द व वाक्यप्रयोग शिरतात आणि ती समृद्ध बनत जाते याचेच वरील उतारा हे उत्तम उदाहरण होय.

## विभाग दुसरा

### प्रकरण सहावे

## माडियांची गीतसंपदा

### लोकसाहित्य :–

लोकसाहित्याचा अभ्यास म्हणजे समाजजीवन ज्या कृतीतून व उक्तीतून व्यक्त झालेले असते त्या समाजजीवनाचा अभ्यास होय. समाजजीवनाच्या संदर्भाशिवाय लोकसाहित्याचा अभ्यास करणे म्हणजे प्राण्याच्या निर्जीव कलेवराचा अभ्यास करण्यासारखे होय. लोकसाहित्याचे वर्गीकरण खालीलप्रमाणे करण्यात आलेले आहे.

लोकवाङ्मय (मौखिक अविष्कार)

| लोककथा | लोकगीत | लोककथागीत | लोकनाट्य | इतर संकीर्ण |
|---|---|---|---|---|
| (Folk-tale) | (Folk-songs) | (Ballad) | (Folk-drama) | (उखाणे म्हणी व वाक्प्रचार इ.) |

भारतीय समाज हा कथाप्रिय आहे. प्राचीन परंपरागत धार्मिक ऐतिहासिक आणि विविध ज्ञान प्राप्त करण्यासाठी कथावाङमयाचा उगम आढळतो. मूळ गाभा परंपरेने चालत आलेला असतो. कुशल निवेदन करणारा निवेदक आकृतीबंधात फरक करतो.

लोककथांच्या निर्मितीची व विकासाची प्रक्रिया गुंतागुंतीची व आकलन होण्याच्या पलिकडील आहे. लोककथेचे नेहमी परिष्करण व पुन: पुन: नवनिर्मिती होत असते.

---

[1] मांडे, प्रभाकर (डॉ.) लोकसाहित्याचे स्वरुप, परिमल प्रकाशन, औरंगाबाद, १९७८ पृ. २४३

दंतकथा, शौर्यकथा किंवा आख्यायिका अथवा लोकभ्रमातून लोककथांची निर्मिती होत असावी असे वाटते. ऐतिहासिक पराक्रम व पूर्वजाबद्दलच्या आदराच्या भावनेतून लोककथांची निर्मिती आढळते.

सण, उत्सव, सामाजिक रुढी, धार्मिक विधी ह्यातून निर्मिती प्रक्रिया सतत घडविली जाते. लोक प्रतिभा ही अशा लोकवाङ्मयाची गंगोत्री असावी.

भाषेच्या उद्गमासंबंधी किंवा भाषिक कुळासंबंधी विचार केल्यानंतर, केवळ बोली स्वरुपात असूनही समृद्ध साहित्य असल्याचे श्रेय माडिया गोंडीला लाभले, ह्याचे कारण तिच्यातील लोकसाहित्य होय, हे सहज लक्षात येते.

माडिया लोक निसर्गतःच नादलुब्ध असल्याने लोकगीतांवर आधारित वाङ्मय (Folk songs) हे त्यांच्या माडिया-बोलीचे दैदिप्यमान आभूषण होय. त्याचप्रमाणे लोककथा, धार्मिक कथा, इ. मधून त्यांच्या समृद्ध बोलीचे व समाजजीवनाचे-संस्कृतीचे दर्शन घडते. लोक वाङ्मयाबद्दल लिहिताना डॉ. अलेक्झांडर क्रेप हे त्यांच्या 'The Science of folk-lore, ह्या पुस्तकात म्हणतात- 'The folk-song is a song i. e. I yric poem with melody which originated anonymously among un--lettered folk in time--past and which remained in currency for a considerable time as a ray for centuries.,2

माडियांच्या जीभेवर कोरलेले पण अलिखित असे वाङ्मय ह्या लोकसाहित्यातून आपल्याला पहावयास मिळते. सर वॉल्टर स्कॉट ह्यांनी म्हटल्याप्रमाणे- लोकवाङ्मय म्हणजे-...'

'.... a work of great interest, might be compiled upon the origin of popular fiction and the transmission of similar tales from age to age and from country to country.'

लेनिन म्हणतो - 'Folk-lore is a material about the hopes and yearnings of the people.'3

लोकांच्या आशा आणि आत्मभावना व्यक्त करण्यासाठी लोकांकडून हे वाङ्मय निर्माण केले जाते.

---

2 Krappe, Alexander, The Science of folk-lore, 1905, p. 153

३ बाघमारे, जनार्दन लोकसाहित्याचा नवा दृष्टीकोन, महाराष्ट्र दलित साहित्य संघ, सम्मेलन दुसरे, दि. २२-११-५९ (सम्मेलनातील भाषणाच्या आधारे)

मॅक्झिम गॉर्की म्हणतो –' One cannot know the life of the people without studying their folk-lore and songs.'[४]

लोकसाहित्यात प्रामुख्याने लोकगीते, गद्यप्रकारात लोककथा, दंतकथा, देवादिकांच्या कथा, आणि पद्यप्रकारात म्हणी, उखाणे इत्यादींचा समावेश होतो.

गांधीजी म्हणतात – ' Folk-lore is the literature of the people but, it belongs to an order of things that is passing away, if it has not already done so.'[५]

जगातल्या लोकसाहित्यात विलक्षण साम्य आढळते. कारण ते सर्वसामान्य मानवी भाव–भावनांशी निगडीत असते. गतकालीन स्मृतींमधून त्यांच्या संस्कृतीचे जतन होते. कारण त्यांच्या श्रद्धा पौराणिक कथा आणि धार्मिक गीतातून वर्षानुवर्षे चालत आलेल्या आहेत. अशा कथा सामान्यतः बडादेव आणि कुलप्रमुखांवर आधारलेल्या आहेत.

माडियांची लोकगीते गेय आहेत. ह्या गीतात गेय अशा गीतरचनांना प्राधान्य असून त्यात धरती आणि आकाश, जंगले व झाडे, फळे–फुले, टेकडया, सतत बदलणारे ऋतुमान, नद्या इतकेच नव्हे तर प्रेम आणि वासना ह्याचे अनावृत्त व निःसंकोच वर्णन दिसते. नृत्यप्रसंगी आणि विविध समारंभ प्रसंगी त्या गीत रचनांचा वापर होत असतांना आढळतो.

## लोकगीते

लोकसाहित्याच्या संदर्भात लोकगीतांचा अभ्यास ही एक आवश्यक बाब होऊन बसली आहे. व्यक्ती ही समाजाच्या विकासाची परिणती आहे. अप्रगत व साक्षर नसलेल्या जमातींमध्ये समुहाची, समष्टीची भावना असते. त्या जमातीतील व्यक्तींच्या भावभावना, इच्छा, आकांक्षा व वृत्ती ह्या सारख्या असतात. असा समुहभाव जेथे प्रकर्षाने असतो तेथे एकाच व्यक्तीचा अनुभाव हा सर्वांचा अनुभव ठरतो. समुहातील सर्वच व्यक्तीचा अनुभाव हा सर्वांचा अनुभव ठरतो. समुहातील सर्वच व्यक्तींनी अशा अनुभावाच्या अभिव्यक्तीत भाग घेतलेला असतो. हाच समूहभाव भाषेतून, कथेतून, गीतातून व धार्मिक विधीतून व्यक्त होतो. त्याचा निश्चित ' अमूक–एक ' कर्ता असे सांगणे कठीण असते. एकाच जमातीतील लोक, विधी, उत्सव, सण इत्यादी प्रसंगी एखाद्या सार्वजनिक ठिकाणी एकत्र जमतात, त्यावेळी त्यांच्याकडून सामुहिकपणे एकाच मानसिक अवस्थेतून अशा गीतांच्या

४ उ. नि.
५ उ. नि.

निर्मितीची जडणघडण होत असते. त्यांच्या मागील प्रेरणा ह्या सामाजिक असतात व्यक्तिगत किंवा कलात्मक स्वरुपाच्या नसतात.[६] धर्म, भाषा, विधी, संस्कार इ. विविध अंगामधून संबंधित सामाजिक मनाची अभिव्यक्ति होत असते.

लोकगीते लोकसमुहाच्या बोलीतच असतात. बोलीची मुळप्रवृत्ती मौलिक असल्याकारणाने ती मुक्त, बंधनरहित आणि चैतन्यपूर्ण असते. लोकसमहाचा व्यवहार हा समुहविशिष्ट बोलीतच असतो. लोकगीतांचे स्वरूप उन्मुक्त असते. करण ते नियंत्रित स्वरुपाचे नसते. लोकसमुहातील व्यक्ती ही समुहजीवनच जगत असते. अप्रगत लोक, वातावरणाच्या, निसर्गाच्या सान्निध्यात असल्याने व्यक्ती–व्यक्तीत अंतर कमी असते म्हणून समूह–जीवनाचा अविष्कार होतो.

आदिवासींच्या जीवनात लोकगीतांचे स्थान फार मोठे आहे पिढ्यानपिढ्या चालत आलेल्या गीतांच्या व कहाण्यांच्या सहाय्याने त्यांची संस्कृती टिकून आहे. त्यामुळे लोकगीतांच्या अभ्यासाशिवाय त्यांच्या संस्कृतीचे सम्यक दर्शन होत नाही. त्याच्या सर्व अशा आकांक्षाचे दर्शन लोकगीतांमधुन घडते असे म्हणता येईल.

लोकगीते केवळ गायली जात नाहीत तर नाचत म्हणण्यात येतात. आत्यंतिक आनंद व दुःख अनेक भावनावेग लयबद्ध हालचालीतून व्यक्त होतात. ह्याच हालचालींना परंपरेने सुसूत्रता आली व त्यातूनच नृत्याचा उगम झाला. लोकनृत्य व लोकगीतांचा फार जवळचा संबंध आहे. आदिवासींची लोकगीते लोकनृत्याच्या संदर्भातच अभ्यासावी लागतात. म्हणूनच ह्यांना 'नृत्यगीते' म्हणणे जास्त समर्थक ठरेल. कारण कोणत्याही आदिवासीला एका ठिकाणी बसून गीत म्हणणे किंवा सांगणे जमत नाही. सवंगड्यांच्या सोबतीने ढोलाच्या तालावर त्यांचे गीत, ओठातून स्फुरते, शब्दबद्ध होते. कदाचित त्यात काव्य कमी असेल, कदाचित संगीताच्या कसोटीलाही ते उतरणार नसेल, पण ते परंपरेशी व निसर्गाशी नाते सांगणारे निश्चित असते. शोकाचे, आनंदाचे, मीलनाचे, उल्हासाचे प्रसंग हे असल्या लोकगीतामधून नृत्याच्या माध्यमाने साजरे होत असतात.

लोकगीतांचे गेयता हे आणखीन एक वैशिष्टच होय. रचनात्मक कौशल्य जरी कमी असले तरी त्यांची उणीव गेयतेच्या माध्यमाने भरून काढण्याचा प्रयत्न असतो.

## लोकगीतांचे स्वरूप विशेष [७]

लोकगीते ही पारंपारिक स्वरुपाची असल्याने ती समुहाची निर्मिती होत. त्यादृष्टीने त्यांचा कवी अनामिक असतो.

---

६ मांडे, प्रभाकर (डॉ.) लोकसाहित्याचे स्वरुप, पृ. २४३

७ उ. नि. पृ. ३१५

लोकगीतांची सतत जडणघडण चालू असते म्हणूनच पाठभेद आढळतात. पण प्रत्येक पाठ मौलिक स्वरूपाचा असतो.

गेयता व स्वरूप–प्रधानता ही आणखीन दोन वैशिष्टये होत. लोकगीत हे गायचे असते. समूहमनाचा त्यात विचार असतो. सामुहिकपणे गाण्याची गीते असल्याने त्यांत श्रोत्यांचा विचारच केलेला नसतो.

लोकसंस्कृतीचे सरल, भावपूर्ण, स्वरूप–दर्शन त्यात आढळते. कालाचे बंधन असते.

आशय व रचनेच्या पुनरावृत्तीमुळे ढोबळ स्वरूपाचे वर्णन आढळते. मात्र परंपरा सातत्य असल्याने जुन्या प्रथांचे अवशेष लोकगीतात डोकावतात.

वरील सर्वसामान्य वैशिष्टये तर माडियांच्या लोकगीतात आढळतातच परंतु आणखीनही काही वैशिष्टये ठळक रीतीने आढळतात.

माडियांच्या लोकगीतांचे विषय आणि शब्द अनेकदा प्रसंगानुरुप बदलतात. एका अर्थी शीघ्र कवित्वाचा अविष्कार तेथे आढळतो. व्यक्ती, प्रसंग, अनुभव, भावना इत्यादींच्या आधारे पूर्ण गीतच नवे बनते किंवा जुन्या गीतात फेरबदल होतो.

माडिया सोडून गोंडीतील रूढ, इतकेच नव्हे तर लगतच्या मराठी, हिंदी, भाषिक प्रदेशातून घेतलेले शद्ब, नृत्यगीत गाणारे मोठया चवीने आपल्या गीतात स्वीकारतांना आढळतात.

निसर्गातील अनेक गोऽटींचा प्रतीकात्मक उपयोग केलेला आढळतो, शृंगाराला प्राधान्य असते. कारण युवा–युवतीच्या समूहनृत्यामध्ये घोटूलच्या जवळ, विवाह प्रसंगी ही गीते प्रामुख्याने म्हटली जातात. तसेच त्यात थट्टा–मस्करी चेष्टा इत्यादिला प्राधान्य असते.

## माडियांची लोकगीते (नृत्यगीते)

गीत म्हटले की लय आणि तालबद्धतेशिवाय माडियांना म्हणता येत नाही. पटकन पाचसात मुली किंवा मुले व मुली रांगत उभे राहून परस्परांच्या गळ्यात व कमरांवर हात ठवून एकदा एका बाजूला तर एकदा दुसऱ्या बाजूला पायांनी ठेका धरत, गाणी म्हणायला सुरुवात करतात. फार रुढ आणि त्यांना आवडणारे नृत्य म्हणजे ' रेलाँऽऽऽ ' नृत्य होय. मधुर हास्य फुलवित ते गाऊ लागतात......

' रिरीलो ऽऽ रेलाँ ऽऽ रिरीलो ऽऽऽ '

अनेक गीतांसाठी रेलाँ ऽऽऽ हे पालुपद किंवा ताल समजण्यात येते.

गीतापूर्वीचा, मधला, शेवटचा आलाप म्हणजेच रेलाँऽऽ. रेलाँऽऽ हेच त्यांचे मनोरंजनाचे साधन असल्याने विविध प्रसंगी होणाऱ्या गीतनृत्यात रेलाँ असतोच. बडावेदव पूजन, विजयादशमी उत्सव, दसरा, लग्न समारंभ व धार्मिक कार्यक्रम किंवा सामाजिक समारंभाचे वेळी रेलाँ असलाच पाहिजे. बडादेव व दंतेश्वरी देवी पासून तो निसर्गावर, विवाह, आणि वैवाहिक जीवनावर वैवाहिक स्वप्नांवर, लग्नसमारंभांवर, प्रेमावर, मुलींच्या छेडखानीवर, 'रेल्यांची' गीते आधारलेली असतात.

## एक शृंगारीक नृत्य गीत

| गीत | स्थुलमानाने मराठी अर्थ |
|---|---|
| रेलाँऽ रेलाँऽऽ आँऽऽ | |
| नावारेऽऽ | प्रियकरा |
| नावारे च्याते मरका मरा | आहाहा, (किती सुंदर ही माझी बाग) |
| मरका मरा वारून वातारे | हे बघ आंब्याचे झाड |
| आली शृंगार डोले वाता | किती सुंदर बहर आला आहे त्याला |
| रिरीलो रेलाँ रिरीलो ऽऽ...१ | ते वाऱ्यावर डोलतं आहे. |
| नावारे च्याते लिंबु मरा | आणि हे बघ लिंबाचे झाड |
| लिंबु मरा वारुन वातारे | लिंबाचे झाड वाऱ्याने डोलत आहे |
| आली शृंगार डोले वाता | कसं सुंदर दिसत आहे ! |
| रिरीलो रेलाँ रिरीलो ऽऽ...२ | |
| नावारे च्याते शितीमरा | आणि हे बघ शेवताचे झाड |
| रेंगा मरा वारून वातारे | बोरीचे झाडही वाऱ्यावर डुलत आहे. |
| आली शृंगार डोले वाता | वाऱ्यावर डोलतांना ही झाडे सुंदर |
| रिरीलो रेलाँ रिरीलो ऽऽ...३ | दिसत आहेत. |
| नावारे च्याते सिता मरा | सिताफळाच्या ह्या झाडाकडे बघ. |
| सिता मरा वारून वातारे | हे सिताफळाचे झाड वाऱ्यावर डोलत आहे. |
| आली शृंगार डोले वाता | वाऱ्यावर डोलताना सुंदर दिसत आहे. |
| रिरीलो रेलाँ रिरिलो ऽऽ...४ | |
| नावारे ज्वानी मंता होशा ! | अरे, माझं तारुण्य असंच नाही का ! |
| तू रं हिद मंता....? | तू रे (प्रियकरा) कुठे आहेस ? |
| रिरीलो रेला रिरिलो ऽऽ....५ | |

गोंडी आणि मराठी भाषेने प्रभावित अशा एका शृंगारिक गीताचा हा नमुना आहे. घोटुलजवळ नाचणाऱ्या युवायुवतींचे हे आवडते गीत आहे. एखाद्या उत्तम कवीने निसर्गातील फळाफुलांच्या आधारे युवतीच्या यौवनाचे वर्णन करावे तसेच वर्णन त्यात आहे. आंबे, लिंबू, सिताफळ या फळांनी लदबदलेल्या व डोलणाऱ्या झाडांचे रूपक प्रेयसी स्वतःच्या आतूर शरीराचे वर्णन करण्यासाठी करते हे शेवटच्या कडव्यावरून स्पष्ट आहे. शेवंतीच्या फुलाचा सुगंधही त्यात काहीतरी सुचवून जातो. प्रणयोत्कटतेनी ओथंबलेले हे गीत सूबक स्वरूपात असून बोलीतील अर्थ अलंकारिकता स्पष्ट करते. न शिकलेल्या समाजातील हे गीत आहे हे लक्षात घेतले पाहिजे.

वारून आणि बारून असे दोन्हीही प्रकारे उच्चार करण्यात आलेले आहेत, कारण उच्चारात 'ब' 'वा' 'ब' अनेकदा होतो. या गीतावर गोंडी आणि मराठी भाषेचा बराच प्रभाव आढळतो. तो गडचिरोली ह्या लगतच्या भागातून झाला असावा. उदा.

| गीतातील शब्द | मराठी शब्द | गीतातील शब्द | मराठी शब्द |
|---|---|---|---|
| वात | वारा | लिंबू | लिंबू |
| शृंगार | सुंदर | शिती | शेवंती |
| | | सिता | सिताफळ |

वारा यासाठी माडिया शब्द 'वडिःय्यु' असा आहे. 'मरा' म्हणजे झाड हा माडिया बोलीतील शब्द, त्याचा प्रत्यय लावून झाडांची नावे केली आहे. 'मरा' हा शब्द गोंडी व माडियात सारखाच आहे. 'ज्वानी' (जवानी) हा मूळ हिंदी भाषेतून स्वीकारलेला शब्दही आढळतो. वास्तविक माडियात तारुण्य किंवा तारुण्यवती दर्शक शब्द 'लेऽऽय्या' हा आहे. बाह्य जगाशी सतत संपर्क आल्याने हे शब्द साहित्यात शिरलेले आहेत 'तू रं हिद मंता ?' यासाठी माडियात

'निम्मा बगा महानीन !'
'तू कुठे आहेस !'

असे म्हणतील. बाह्य जगाशी संबंध आलेल्या काही व्यक्ती दुसरे शब्द आपल्या मौखिक लोकगीतांमध्ये टाकतात. नंतर इतरही व्यक्ती ती गीते तशीच म्हणतात त्यामुळे मूळ शब्द वगळण्यात येतो असेही कारण सांगता येईल.

गोटुल (किंवा घोटुल) समोर सायंकाळी सुरू होणाऱ्या व रात्री दहापर्यंत चालणाऱ्या युवक युवतींच्या रेलाँ नृत्यात अशी गीते असणे एक प्रकारे आवश्यक आहे. त्यांच्या भावनांना उधाण येते; आणि मदनाचा संचार होतो. (घोटुलची

अधिक माहिती चवथ्या प्रकरणात दिली आहे) यावरून काव्य किंवा वाङ्मय हे त्या जमातीच्या सामाजिक निकडीच्या दृष्टीनेही किती उपयुक्त आहे; याची कल्पना येते. ढोलाच्या वाद्यांचे सूर आणि त्यावर आधारित पदन्यास पुन्हा सुरू होतात......

तीडपीड तीडपीड
तीडपीड गडज्युम् गडज्युम्
तीडपीड तीडपीड
तीडपीड गडज्युम् गडज्युम्

## मर्मीना रेला पाटा
## (लग्नाच्या रेल्याचे गाणे)

| | |
|---|---|
| रे रेला ऽऽऽ | (नवऱ्या मुलाला 'दादी' असे म्हणून) |
| जोडी जोडी इनदादी, | जोडी जोडी (बायको) म्हणता पण |
| वंजी वालवाल दादी, | दादी, त्यासाठी हिरवे हिरवे धान दे. |
| वंजी वालवाल ऽऽ... | |
| (धान हिरवे) | |
| गाडा नुका दोम्ते दादी | (जेव्हा) गाडाभर तांदूळ टाकशील, |
| (गाडाभर तांदूळ टाक) | |
| वंजी वालवाल दादी ऽऽ... २ | |
| अरके निवा जोडी दादी | धान टाकशील तेव्हाच बायको तुझी |
| तेव्हा तुझी जोडी | होईल. (जोडी—जोडीदारीण ह्या अर्थाने) |
| वंजी वालवाल दादी ऽऽ...३ | |
| पूनम जोडी दुर्रको दादी | दादी, फुकट बायको मिळत नाही. |
| फुकट जोडी मिळत नाही. | |
| वंजी वालवाल दादी ऽऽ... ४ | |
| कोरट पारी लोने दादी | कोंबडा व्याह्याच्या घरी पोहोचव |
| कोंबडा व्याही घरी | (मग बायको ने) |
| वंजी वालवाल दादी ऽऽ... ५ | |
| दूरत बोकडा दोहानेके, अस्के, | (धानाच्या) बैलगाडीच्या |
| धुऱ्याला बोकड बांधलेला असतांना, तेव्हाच | धुऱ्याला बोकड बांध, तो बांधला असेल तेव्हाच तुझी |
| निवा जोडी दुर्रको दादी | बायको तुला मिळेल. |
| तूला जोडी मिळेल. | |
| वंजी वालवाल दादी, वंजी वालवाल ऽऽ ६ | |

(माडिया शब्दांच्या खाली मराठीत प्रतिशब्द दिले आहेत)

या गाण्यातून मैत्रिणी व मेहुण्या (होणाऱ्या) अशा प्रकारे नवऱ्या मुलाला मुलीची किंमत देण्याचे (त्यांच्यात Bride-Price ची पद्धती आहे) आठवण करुन देतात आणि बायको फुकट मिळत नाही म्हणुन टिंगल करतात. हांसण्या-खिदळण्याचे आवाज व आंगलट करून ढुस्से मारुन विनोद चालू असतात.

नंतर मुलीकडे रोख असतो. मुलीला (नवरीला) लग्नासाठी मुलाकडे नेतांना म्हणण्यात येणारे गीत.

| | |
|---|---|
| रेलों ऽ रेलों ऽ रे रेलों ऽऽ | |
| सीलीमेटा हनुम दादी | वर्षासाठी जा बाई–आनंदाने |
| वर्षभर सण | (सण–आनंदाने ह्या अर्थी) |
| रेरेलो रेरेलो ऽऽऽ | |
| किनोर बिनीर हनुम दादी, | हासत नाचत आहे दादी (नवरा) |
| निवा दायना जाडो दादी | तुला घेऊन जाईल. दादी |
| किनीर बिनीर हनुम दादी | हाचत नाचत तुला नेईल (घरी) |
| किनी बिनीर रेरेलो ऽऽ रेरेलो ऽऽ | (सुखाने) हासत नाचत जा. |

'हासत–नाचत (किनीर बिनीर) मुलीला मुलाकडे' लग्नासाठी नेल्यानंतर मुलाच्या मांडवात–शृंगारलेल्या व लतापल्लवांच्या आणि मोरपिसांच्या मांडवात–एक कोरीव लाकडी खांब असतो. त्याला देव बांधलेले असतात व त्याच्या भोवती विविध वयाच्या मुली, प्रौढ स्त्रिया इतकेच नव्हे तर जख्ख म्हाताऱ्या हातात हात घेवून खांद्यावर हात ठेवून वर्तुळ करून नाचत असतात. दोन, तीन, चार वर्तुळात नाचताना गाणी म्हणण्यात येतात. थोडी ताडी किंवा मोहाची दारु चढलेली असते

मुलाच्या मांडवात मुलीकडच्या मुलामुलींनी म्हणावयाचे गाणे.

| गीत | आशय |
|---|---|
| रीऽ रिलो,ऽऽ रीऽ रीऽ लोऽऽ | सालईचा (झाडाचा) खांब वाकलेला |
| साले मुंडा रोयता | (तसे) तुझे लोकही वाकलेले आहेत. |
| सालई खांब वाकलेला | |
| निवा मुलू रोयता | |
| तूझे लोक वाकले. | |
| निवा रेलो ऽऽ मुलये ऽऽ...१ | तुझी लहान बहीण व लोक |
| तुझी लहानबीण (व) लोक | (सर्व वाकलेले आहेत). |
| पाटा होतेके ना टो रके | दुसरेच गाणे म्हणत आहेत. |
| गाणे म्हणतात दुसरेच | |

| | |
|---|---|
| निवा रेलो * मुलूयें | तुझी लहान बहीण व लोक |
| रिरोलो ऽऽऽ ...२ | |
| धर्मम पाटा ओस्ता | (हे सर्व) फुकट किंवा उगीचच |
| फुकट गाणे म्हणतात. | गाणे म्हणत आहेत. |
| साले मुंडा रोयता | सालईचा खाब वाकला आहे. |
| निवा रेलो मुलुये, रिरीलो ऽऽ...३ | |
| निकू पोहची दायनू | तुला (तुझ्या घरी) सोडून जातील. |
| तुला सोडून जातील | तेव्हा तुझा |
| नीवा जीवा उंई ता | तेव्हा तुझा जीव लहानलहान होईल |
| तुझा जीव लहान-लहान होईल. | (म्हणजे तू दुःखी होशील) तू |
| निवा रेलो मुलूये | तुझी लहान बहीण व लोक (उगीचच) |
| रि री लो ऽ रि री लो ऽऽ... ४ | गाणे म्हणत आहेत. |

या गाण्यातील भावना 'जा मुली जा, दिल्या घरी तू सुखी रहा' किंवा गंगायमुना डोळयात उभ्या का ?' ह्या प्रसिद्ध भावगीताहून किंवा आपल्याकडे मुलीकडच्या स्त्रिया जी विहीण म्हणतात त्यातून निश्चितच भिन्न नाहीत.

## लग्नमंडपात पाहुण्यांच्या स्वागतासाठी गाणे

| | |
|---|---|
| एरे बाईरो एरे बाईरो | जवळ या, जवळ या, |
| जवळ या जवळ या | (पाहुणे मंडळी) लग्नाला या |
| मर्मीत बाईरो मर्मीत बाईरो | |
| लग्नाला या लग्नाला या (१) | |
| मर्मीत बाई कब्बड किसी अट्ट | लग्नाला या आणि काम करून जा |
| लग्नाला या, काम करून जा | |
| नम्म संगीन, नन्न संगोन जीवाअस्ता बाई | आम्ही तुमचे तुम्ही आमचे |
| आम्ही तुमचे तुम्ही आमचे प्रेमाने या (२) | म्हणून प्रेमाने लग्नाला या. |
| सांगोना दीवाना बारी वायो | मेहुणीच्या बरोबर खुशी |
| मेहुणीच्या गंमत कशी येईल | (किंवा गंमत) करु मग |
| (सह) | |
| ऐरे बाई रो, एरे बाईरो | कशी मजा येईल. |
| रिरीलो ऽऽ रिरीलो ऽऽऽ...(३) | या हो या, लग्नाला या |

वरील गाण्यातही गोंडी शब्दांचाही बराच प्रभाव असून काही प्रत्ययही बदलले आहेत.

* 'मूळ शब्द 'येलो' पाठभेद होऊन रेलो. येलो म्हणजे लहान बहीण.

माडियात 'मर्मीग' म्हणजे लग्न असा शब्द आलेला आहे. तर अनेकदा 'मर्मीत' हा गोंडीच्या प्रभावामुळे शब्द आलेला आहे. 'दिवाना' हा सरळ हिंदी-तील शब्द घेतलेला आहे. माडियात 'खुशी' असा शब्द आहे.

'बारी' हा गोंडी शब्द असून 'बारकेईला' हा माडिया शब्द आहे. त्याचा अर्थ 'कशाला' असा होता.

तसेच 'मर्मीत वाई' ह्यात 'वायो' म्हणजे आले किंवा 'वट' म्हणजे 'या' असा मूळ माडिया शब्द पाहिजे पण गेयतेच्या दृष्टीने पाठभेद 'वाई' असा झालेला आढळतो.

## सणांची गाणी

दसरा, पिन्डी पंडुम, विज्जा पंडुम इत्यादी महत्वाचे सण असतात. पहिला महत्वाचा सण पिन्डी पंडुम असून धान निघण्याच्या वेळी असतो. पहिल्याने धान निघाल्यावर प्रत्येक घरातून पेरमा, पाटील व भुमिया ह्यांना प्रत्येकी तीन टोपल्या धान नेवून देतात. तोपर्यंत नवीन धान दळत नाहीत. याला 'कोड्डी पोलवा' म्हणतात. 'पोलवा' म्हणजे कोणतीही पूजा, ही पूजा सार्वजनिकरित्या गावाबाहेर नदी किंवा नाल्याच्या काठी किंवा जंगलात होते. पीठ दळण्याचा सण झाल्यावर नवीन धान दळणे व खाणे सुरु होते. हा सण मार्च मध्ये येतो. विज्जा पंडुम हा दुसरा महत्वाचा सण. जुलैमध्ये येणाऱ्या या सणाने बी पेरणे सुरु होतो. कोणत्याही सणाला पंडूम म्हणतात.

### सणाच्या वेळी म्हणण्याचे वैशिष्टपूर्ण गीत

| | |
|---|---|
| बाबाले बाबाले ऽऽ | बाबाले (लोकांना संबोधन) |
| रीरीलो, रीरीलो ऽऽ | |
| उजबत्ती पूजा रोय रीरीलो ऽऽ | उदबत्तीने पूजा करू या. |
| नारेल-काया पूजा रोय, रीरीलो ऽऽ | नारळाने पूजा करू या. |
| निम्मे पूजा विडस्तीन, रीरीलो ऽऽ... १ | तुला पूजा अर्पितो. |
| साली मेआ हनूमी | वर्षातून एकदा मोठा सण. |
| नीवा कडाते वातोम | तुझ्या कडयापाशी (अंगणाशी) आलो |
| (खडाते) | (किंवा खळयावर आलो.) |
| हातेक बारा मारीया...ऽऽ | माडिया मेला तर (संपलेच) |
| मेलो तर | |
| पिस्ते ऽ बारा...ऽऽ | वाचलो तर. |
| पेगाएंड् ओस्सो वाईकोम | पुढच्या वर्षी पुन्हा येऊ. |
| निवा कडाते वाईकोम | तुझ्या कडयापाशी (दाराशी) येऊ. |
| साली मेटा, हनूमी, रीरीलो ऽऽ...२ | वर्षातून एकदा हा सण येतो. |

वरील गाण्यात 'कहाते' असा शब्द घेतल्यास ज्या आंगणाला कडे (बांबुचे तट्टे) लावलेले आहेत त्या अंगणाशी किंवा दाराशी असा अर्थ होतो. उलट 'खडाते' असा पाठभेद घेतल्यास खळ्यावर (ळ–चा उच्चार ड सारखा होऊन) असा अर्थ होतो. दोन्हीही अर्थांनी ही ओळ म्हणण्यात येते असे निदर्शनास आलेले आहे.

## पिन्डी पंडूम (पीठ दळण्याचा सण)

री री लो ऽ री री लो ऽऽऽ

| | | | |
|---|---|---|---|
| कोडका | पिट्टे | बलकेम | आस्ता ? |
| चिमणी | पक्षी | धष्टपुष्ट | होत आहे का ? |
| आयो ऽ ये ऽऽ | आयो ऽ ये ऽऽ | | |
| नाही | नाही | | |
| बाबान पागा | बलकेम | | आस्ता ? |
| बाबांचा फेटा | मोठा | | होत आहे का ? |

आयो ये ऽऽ आयो ऽ ये ऽ री री लो ऽऽऽ
नाही नाही

पिठाची पूजा करून नंतर ते खाल्यामुळे मनुष्य धष्ठपुष्ट होतो व त्याची किर्ती आणि महत्व वाढते हे वरील दोन कडव्यात दोन रुपके घेवून दर्शविण्याचा प्रयत्न आहे. काहींनी प्रश्न विचारावयाचा व दुसऱ्यांनी उत्तरे द्यावयाचे असे गंमत करीत हे गीत म्हणण्यात येते.

सर्वात महत्वाचा सण म्हणजे दसरा. अरण्यातून असंख्य माडिया याच सणाला बाहेर येतात व अहेरीचे जमीनदार आणि माडियांचे व सर्व गोंडांचे परंपरागत राजे–नव्हे कुलदैवतच– राजे श्री विश्वेश्वरराव महाराज ह्यांच्या दर्शनाला येतात. त्यांच्या पावलांचे चुंबन घेऊन जुने कलदार रुपये वाहतात व भेटी आणतात, महाराजांची पालखी निघते, त्या सणाचे पुढील गीत.

## दसरा पाटा (दसऱ्याचे गीत)

| | |
|---|---|
| तिना नामूर, नेई नामूर | हा केवळ सूर आहे. |
| हो ऽ हो ऽ हो ऽ (धृ) | |
| तेदाना उदाना | उठत बसत |
| मावोर बाबाना डेरा | आमच्या लोकांचा अड्डा किंवा जमाव (चालला आहे) |
| नेई नामूर ऽ नाना ती ती ऽऽ | |
| अहेरी नाटे ऽ जीम्मेदार ऽऽ | अहेरी गावाचा जबाबदार असलेल्या |

| | |
|---|---|
| रामराम बोलो | (राजाला) राम-राम करुन |
| तेदाना उदाना | उठत बसत |
| मावोर बाब ना डेरा | आमच्या राजाचा जमाव |
| तिना नामूर नेई नामूर हो हो | (दसऱ्याला पोहोचले) |

उठत बसत म्हणजे मजल दरमजल करीत सर्व मंडळी 'डेरा' किंवा 'अड्डा' / जमाव त्याचा राजा-अहेरीचा जिम्मेदार / जबाबदारी असलेला राजा-त्याच्या मुक्कामाकडे पोहोचली. ह्या गाण्यातील 'तिना नामूर नेई नामूर' ही रेलाँ पेक्षा एक स्वतंत्र लय आणि तालयुक्त अशी धून असून प्रामुख्याने पुढे जाण्यासाठी व जमावाला सहज सहज अंतर कापता यावे यासाठी उपयोगात आणण्यात येणारी लय वाटते. एक प्रकारे त्यांचे हे (Marching Song) आहे.

अहेरीला पोहोचल्यानंतर राजाला उद्देशून पुढील प्रकारचे गाणे म्हणतात. हे गाणे राजाला जणू आळवून म्हणण्यात येते.

**राजाला उद्देशून –**

| | |
|---|---|
| बाबा ऽ ले ऽ बाबा ऽ ले ऽ ऽ | बाबाले (हे राजा) |
| चिट्टीत पोहोन चिट्टी ऽ बालाले ऽ ऽ | तू पुन:पुन्हा पत्र |
| चिठ्ठी (पत्र) पुन्हापुन्हा चिठ्ठी | पाठवून आम्हाला बोलावले |
| डागता पोहोन डागी बाबाले ऽ ऽ | तू पत्र पाठवून बोलावलेस |
| पत्र पुन:पुन: पत्र | |
| निम्मे चिटी लोहतानीन बाबाले | तू पत्र पाठवून बालावले |
| पटीन पटीन चिटी बाबाले | प्रत्येक पट्टीत (विभागात) |
| लोहतानीन बाबाले ऽ ऽ ऽ | पत्र पाठवून बोलावलेस, |
| चिटी पोहोन ऽ चिठ्ठी बाबाले ऽ ऽ | तू पुन:पुन्हा पत्र पाठवून बोलावलेस |
| | (म्हणून आम्ही आलो) |

वरील गाण्यात चिटी किंवा चिठ्ठी म्हणजे पत्र असा अर्थ होतो. काही वेळा 'निम्मे डागी लोहतानीन बाबाले' असेही म्हणतात. म्हणजे डाग हा शब्द पत्र ह्या अर्थाने वापरतात. लोहतानीन म्हणजे पाठवून व पोहोन म्हणजे पुन:पुन्हा असा अर्थ होतो. राजाबद्दलच्या अपार प्रेमाने हे गाणे म्हणण्यात येते.

**इनामासाठी गीत –**

पूर्वी महाराज अरण्यात जात तेव्हा त्यांना फुलांच्या माळा घालून, त्यांच्या समोर नाचून त्यांना बक्षीस मागत असत. आज नवीन लोक आलेले आढळले तर नाचून 'इनाम' मागतात तेव्हा तेच पूर्वीच गाणे म्हणतात.

| | |
|---|---|
| इगोऽ दोऽऽ ले, ऽ इंगोऽ दोऽऽ ले | महाराज तुम्ही इथे आलात |
| इंदियोतार,ऽ नुरेऽ बाबाऽऽ लेऽऽ | म्हणून तुमच्यासाठी आम्ही इथे |

निवसारिग गाऊंगोऽ बाबाऽ लेऽऽ — जमलो आहोत तेव्हा दयाळूपणे तुम्हाला वाटेल ते इनाम द्या.

या गाण्यात माडिया शद्ब बदलण्यात आलेले आहेत.

## दिवाळी सणाचे वेळी म्हणण्यात येणारे गीत.

दिवाळी हा पण एक महत्वाचा सण, आनंदाला भरती येणे साहजिकच आहे. पुढील गीतात दिवाळी जवळ आल्याने खुशीत आलेले मेहुणा मेहुणी परस्परांची गंमत करीत आहेत.

### मेहुणीस आमंत्रण

| | |
|---|---|
| मेहुणा– नावा नाटे दिवाळी संगो | माझ्या गावी दिवाळी (आली) |
| दिवाळी येंदवाला वई | (अग ए) मेहुणी नाचायला ये. |
| मेहुणी– बोऽ हो राजाना वाडा ते संगो ? | कोणत्या राजाच्या वाड्यात ? |
| मेहुणा– गोंडी राजाना वाडा ते संगो | गोंड राजाच्या वाड्यात. |
| साले मेटा दिवाळी संगो | वर्षातून एकदा दिवाळी आली |
| दिवाळीवाता येंदलावा वई | दिवाळी आली, (मेहुणी) तू नाचायला ये. |

दोघे मिळून। रेलाँऽ रेलाँऽ रेरेलांऽऽ आँऽ रेलाऽ

संगो किंवा सांगो म्हणजे मेहुणी, येंदलावा म्हणजे नाचायला. मेहुणीची थट्टा मस्करी माडियांमध्येही रूढ आहे. शद्बांच्या उच्चारणातील गोडवा वाखाणण्यालायक असतो. दुर्दैवाने तो लिखाणातून अनुभवता येत नाही.

## विकासाभिमुख गीते –

परंपरागत चालत आलेल्या सांस्कृतिक संदर्भांवर आधारित अनेक गीते रुढ आहेत ह्यात नवल नाही. पण माडियांची गीतप्रियता दर्शविणारी एक विशेष गोष्ट म्हणजे विकास कार्यक्रमांशी त्यांचा संबंध आल्यावर नवीन विषयांवर आधारित गीते ही निर्माण झालेली आहेत. मुलांना शाळेत पाठविण्याचे महात्म्य सांगणारे पुढील गीत पहा –

| | |
|---|---|
| वाईरो कोको वाई | यारे या, मुलांनो या |
| इस्कूला वाई | शाळेत या. |
| मास्तरे वेतना अ, आ, उ, ऊ | मास्तर शिकवितात अ, आ, उ, ऊ |
| वाता मास्तरी, मम्मट वायो | मास्तर आले तुम्ही या. |
| सरकारना पगार पुन्यम तीन तीन | सरकारची (मास्तरना) पगार फुकट का (मास्तर) खातात ? |
| मा कबड बाहदूर कांते ? | आपण लोकांनी (हयगय) करून कसे चालेल ? |

निवडणूक हा या लोकांना नव्यानेच परिचयाचा झालेला प्रकार आहे. पण त्यावरही पुढील गीत आढळते.

## पोलो (निवडणूक)

| | |
|---|---|
| दा दा, दा, हिक्के पोलो मंता | या या या इथे पोलो आहे. |
| वा, वा, वा. हिक्के वाई (किंवा वट) रो | या या इकडे या. |
| हिल्ले कवाड किसी मन्ता | इथे काम नाही, सगळे केलेले आहे |
| नाही काम केलेले आहे | |
| हुडा, हुडा हुडा इद्दू पट्टे-ते वाटाना | पहा, पहा, पहा, ह्या पार्टीला द्या |
| कागिदी मन्ता | (मतांचा) कागद |
| इद्दू कागिदी पोयसी लोप्पटा | हा कागद (मतपत्रिका) |
| हा कागद पकडून आतमध्ये | पकडून खोलीत जा. |
| अर्रा ने हन्नू | |
| खोलीत जा | |
| वाई रो वाई रो, वाई भिकू बोनकू तुम्हाला कोणाला | या, या, तुम्हाला कोणाला मत द्यायचे आहे. |
| चिठ्ठी वाटाना मन्ता | त्याला मत द्या |
| मत द्यायचे आहे. | |
| हुडा, हुंडा, इद्दू हिल्ले कवाड किसी मन्ता | बघा बघा इथे काम नाही सर्व केलेले आहे. |
| ओना चिन्ना पोहोन इद्दू छापा किमट्ट | ज्याला मत द्यायचे आहे |
| त्याच्या चिन्हावर पुन्हा हा छापा मारा | त्याच्या चिन्हावर छापा मारा |

**एक नवीन प्रकारचे माडिया गीत पुढे दिलेले आहे**

दईन पिला मरका मरातगा केडातगा
केडातगा होता पआ काया तिदाना
काया तिना पजा लोनू वायाना,
लोनू वाता पजा, लोनू वायाना,
गाटो तिदा पजा इस्कोल दायना,
इस्कोल दायना पजा,
अ, आ, इ, ई पढे करयाना,
पढे करता पजा बुद्धी वायन्ता

मराठीत अर्थ :

आंब्याच्या जंगलात जाऊन लहान लहान झाडे तोडीन
झाडे तोडल्यानंतर मग कच्ची फळे खाईन
फळे खाल्यानंतर मग घरी येईन
घरी आल्यानंतर मग भात खाईन
भात खाल्यानंतर शाळेत जाईन
शाळेत गेल्यानंतर अ, आ, इ, ई शिकेन
शिकल्यानंतर बुद्धी येईल.

पाऊस आल्याचा आनंद पुढील गीतातून आणवतो.

| | |
|---|---|
| वडी:य्यु वाता | वारा आला |
| ष्यागव्हू वाता | पाऊस आला |
| बंडांग अरियातांग | गारा पडतात |
| हुडा हुडा. | बघा बघा |
| बंडांग तिंटू, बंडांग तिंटू | गारा खा, गारा खा |
| वडी:य्यु वाता | वारा आला |
| ष्यागव्हू वाता | पाऊस आला. |

सर्व सामान्यपणे लहान पोरेसोरे ही कविता म्हणतात. 'येरे येरे पावसा' सारखीच ही कविता असून एक बडबडगीत असे याचे वर्णन करता येईल.

गोंडीत पावसाला पिरू व वाऱ्याला पळी असे शद्ब आहेत.
तर माडियात पावसाला ष्याग्व्हू व वाऱ्याला वडि:य्यु
शद्ब आहे.

# प्रकरण सातवे

## लोककथा आणि धार्मिक कथा

## लोककथा

समाजाच्या जिव्हेवर कोरलेले पण अलिखीत असे जे वाङ्मय त्याला आपण स्थूल मानाने लोकवाङमयाचे स्थान देतो. लोककथात बहुजन समाजाच्या आचार विचारांचे, कल्पनांचे कृतीचे व मानवी भावभावनांचे इतकेच नव्हे तर प्रेम, जिव्हाळा राग, द्वेष, लोभ, मत्सर ह्यांची सुंदर सरमिसळ आपणास आढळते. असे वाङ्मय सामान्य अशा आकांक्षांचे सुंदर प्रतिक असते.

लोककथांचे प्रकार पाडता येतील, त्यातील सामान्य लोककथा, पौराणिक लोककथा व देवादिकांच्या धार्मिक कथा आणि शौर्यकथा असे स्थूल–मानाने वर्गीकरण करता येईल व याच वर्गीकरणाच्या आधारे लोककथांचा विचार करता त्यांची काही वैशिष्टचपूर्ण लक्षणे आढळतात.

पारंपारिकनेने एका पिढीतून दुसऱ्या पिढीकडे चालत आलेली मौखिक स्वरुपातील ही देणगी आहे.

लोकसमूहाची ही निर्मिती असते त्यात लोकमनाचा विचार असतो.

मूळ निर्माता हा अज्ञात असतो. तरी पण त्या व्यक्ति विशिष्टत्व न राहता समुह विशिष्टत्व असते.

समाजजीवनाच्या व लोकसंस्कृतीच्या अभ्यासाचे ते एक महत्वाचे साधन असते कारण त्यात मानवाने युगानुयुगे घेतलेल्या अनुभवाचे सार असते.

स्वाभाविकता असल्याने भाषेच्या प्राचीन रुपापावेतो जाण्याचा लोककथा हा एक प्रमुख आधार आहे.

## सामान्य लोककथा

### भामरागड विभागातील गोटपाडी गावाजवळील लोककथा

(प्राण्यांवर आधारित)

लोककथांमध्ये करमणूक व वैचित्र्य तर असतेच पण काही बौधप्रद सूत्रही असतेच. खालील कथेवरुन राजा होण्यासाठी फक्त भुलविणारे सौन्दर्यच आवश्यक नाही तर त्याहीपेक्षा बुद्धीमत्ता (मोठे डोके), दूरदृष्टी (मोठे डोळे), व आज्ञा करण्यासाठी आवश्यक गंभीरता, (गंभीर आवाज), ह्या गोष्टी राजाच्या निवडीसाठी आवश्यक असतात हे दाखविले आहे.

पृथ्वीची निर्मिती झाल्यावर सर्व देव नाहीसे झाले. तेव्हा मोर जंगलाच्या बाहेर आला व सर्व पक्षाना उद्देशून म्हणाला, 'मी तुमचा राजा आहे.' तेंव्हा सुंदर सुंदर पंख असलेले पक्षी मोराच्या घरी गेले व चर्चा करू लागले. शेवटी मोठे डोके व मोठमोठे गोल डोळे व गंभीर आवाज असलेल्या घुबडालाच मतदानाने राजा निवडण्यात आले. पण एकटे घुबड राज्य करू शकणार नाही म्हणून पक्षानी त्याला बगळा (**Sea gull**) टिटिवी व पिरोल (**Pirole**) हे तीन मदतनीस दिले. या तिघांच्या मदतीने घुबडराज आजही पक्षांवर राज्य करीत आहेत.

'मनीमावशी मनीमावशी' ही कथा आपल्या लोककथा भांडारात आढळते. आजीच्या कथेच्या पोतडीतून कित्येक नातवांनी अशी कथा ऐकली असेल तशीच ही कथा वाटते.

पृथ्वीच्या निर्मितीनंतर देव अदृश्य झाले. तेव्हा सर्व जनावरे एकत्रा झाली व त्यांनी वाघाला आपला राजा निवडले आणि त्यांच्या मदतीली चित्ता, कोल्हा व रानमांजर ह्यांची निवड केली. जनावरांना जेव्हा भूक लागला तेव्हा त्यानी हरणाची शिकार केली. पण ते हरणाचे मांस खाऊ शकले नाहीत, कारण त्यांच्या जवळ अग्नी नव्हता. तेव्हा शेजारच्या खेडेगावात त्यांनी रानमांजराला अग्नी आणावयास पाठविले. तेव्हापासून अग्नी आणवयाचे काम रानमांजरच करू लागले व अग्नी आणल्यावर त्यांनी मांस खाल्ले. एकेदिवशी नेहमीप्रमाणे रानमांजर अग्नी आणावयास गेले असताना ते परत आलेच नाही. कारण मांजराला खेडेगावात दूध सापडले व दूध मांजराला फार आवडले आणि तेव्हापासून माणसाच्या आश्रयाने मांजर राहू लागले. वाघाने मांजराला खूप शोधले पण मांजर त्याला सापडू शकले नाही. तेव्हा रागारागात त्याने म्हशीला मारले आणि तिचे मांस घेऊन तो घरी आला. त्यानंतर दुसऱ्या दिवशी उरलेले मांस आणण्यासाठी वाघ गेला असता म्हशीचा मालक वाघाची वाटच बघत होता. त्यानी वाघाला मारून टाकले. त्या नंतर रानमांजर गाव त राहू लागले व माणसाळले पण जनावरे मात्र कच्चेच मांस खाऊ लागली.

या कथेवरुन एक निष्कर्ष असा निघतो की, फार पुरातन काळापासून मांस कच्चे खावयाचे नसून ते शिजवून किंवा भाजून खावयाचे असते हे माडियांना माहित होते व ते नवीन पिढ्यांना शिकविण्यासाठी ही लोककथा होय.

**दुसरी लोककथा :–**

दोन लहानसे 'राम–लक्ष्मण' पक्षी राहत होते. बिशी व बूशी ही त्यांची नावे. त्यांनी एक कुऱ्हाड तयार केली व जंगलतोड केली. सूर्याच्या उष्णतेने लाकडे वाळल्यानंतर त्यांनी ती जाळली तेव्हा बिशी व बूशी 'कुमूर–राजा' कडे उडत गेले. व त्यांनी त्याची बी देण्यासाठी प्रार्थना केली. पण त्यांना बी मिळाले नाही. परत येतांना त्यांना एका जागी बी पडलेले दिसले. त्यांनी ते बी त्यांच्या शेताकडे आणले व त्याची पेरणी केली. तेव्हा तिथे काही

दिवसानंतर कुमूर-सोंडा ही वेली वाढू लागली व तिला पुष्कळ प्रकारची फळे लागली. त्या वेलीवरचे सर्वात मोठे फळ फुटले व त्यातून एक मुलगा बाहेर पडला. त्याचे नाव 'बोकाल-माडू.' बाकी उरलेली फळे फुटली व त्यातून निरनिराळे बी-बियाणे बाहेर पडले. बिशी-वुशीने हे पाहिले व ते निघून गेले.

त्यानंतर बोकाल-माडूने एक कुऱ्हाड केली व जंगल तोडले. ती कुऱ्हाड दगडातून लोखंड काढून बनविलेली होती. जंगल तोडून तयार केलेल्या जमीनीत खड्डा करून त्याने ते फळामधून निघालेले बी पेरले. बी वाढू लागले तेव्हा बोकाल-माडू मासेमारीला गेला. त्याने गळाला बी लावले व तो गळ पाण्यात सोडला. माशांच्या आईने ते पाहिले व ती मुलांना म्हणाली, 'त्या बियांजवळ जाऊ नका कारण तो तुम्हाला पकडण्यासाठी टाकलेला सापळा आहे. बोकाल माडू मूर्ख आहे. कारण अग्नी कसा पेटवावा हे त्याला माहित नाही' तेव्हा माशांच्या आईने आपल्या पिल्लांना अग्नी कसा पेटवावा हे सांगितले. दोन बाबूंचे तुकडे घ्यावेत व ते एकमेकांवर घासावेत म्हणजे अग्नी तयार होतो. हे ती आपल्या पिल्लांना सांगत असतांना बोकाल-माडुने गुपचूप ऐकले व तो घरी आला

घरी आल्यानंतर आपल्या लोखंडाच्या कुऱ्हाडीने त्याने जंगल तोडले. ते ते सूर्याच्या उष्णतेने वाळल्यानंतर बोकाल-माडूने अग्नी पेटवून जंगल जाळून टाकले व त्यानंतर त्याला चांगली जागा मिळाली तेव्हा ते खड्ड्यातील बी काढून त्याने पेरले. त्याच्या जवळच त्याने आपल्यासाठी झोपडी बांधली. त्या झोपडीत झोपण्यासाठी आंथरुण होतेच पण इतरही आवश्यक गोष्टी होत्या.

पृथ्वीवर तेव्हा 'गोटूला-मुईतो- हा देव आपल्या 'रेगुला-काटी' ह्या बायको बरोबर राहत होता. त्यांना सात मुली होत्या. त्यांना काही योग्य वर सापडला नव्हता. त्या मुलींनी बोकाल-माडुची माहिती ऐकली तेव्हा त्या सातही बहिणी त्याचेकडे गेल्या तेव्हा बोकाल माडूने त्यांच्यातील सर्वात मोठ्या बहिणीशी लग्न केले. बोकाल-माडू बस्तरचा राजा झाला व मोरामेट येथे राहू लागला. तेथे त्याने मोठा राजवाडा व किल्ला बांधला. आजही त्या किल्ल्याचे अवशेष बघायला सापडतात. त्याच्या नंतर 'इल्लापूरी' हा त्याचा मुलगा राजा झाला.

वरील कथेवरुन जमीन जाळून बी पेरायचे (फेकून द्यायचे) ही शेती करण्याची माडियांची पद्धती परंपरागत असावी असे दिसते. पूर्वी वर्णन केल्यानुसार माडिया फिरती शेती करणारे आहेत. म्हणजे समाजाच्या आर्थिक व्यवहारांची जपणूक सुद्धा लोककथांच्या द्वारे होते. त्याच प्रमाणे बस्तर विभागाशी ह्या विभागाचा असलेला ऐतिहासिक संबंधही ह्या गोष्टीतून ध्वनीत होतो.

## उत्पत्ती संबंधीच्या पौराणिक कथा :-

खालील कथा माडिया लोकांच्या विभागातील एका नावाजलेल्या पेरम्याच्या तोंडून प्रत्यक्ष ऐकलेल्या आहेत.

जगाच्या सुरवातीला फक्त देवच होते. देवरु मुईतो व त्याची बायको नुरो–गुत्ते, पिंडी–मुईतो व त्याची बायको पिंडी मुत्ते. गोटुला–मुईतो आणि त्याची बायको रेगुला काटी व त्याच्या बरोबर भूमी–उंगाल व त्याची बहीण भूमी–उंगी हे राहत होते. ह्या सर्वात देवरु मुईतो हा मोठा देव होता. त्याने एका ठिकाणी पाणी निर्माण केले व भूमी उंगाल ह्या भूताला जमीन तयार करावयास सांगितले. भूमी उंगाल ने 'गुरु' (लोखंडाचा मोठा खिळा) तयार केला व पाण्यात फेकून मारला. गुर पाण्यात गेला व त्याने अग्नी बाणाप्रमाणे पाण्यात उष्णता निर्माण केली. उष्णतेने टेकड्या, मैदाने व पठारे निर्माण झाली व हळू हळू सर्व थंड झाले. भूमी उंगालने त्या जमीनीचे एक गोल बेट तयार केले. माती, वाळू व दगड ह्याचेच ते बनलेले असून पाण्यावर तरंगत होते. त्यावर जीवसृष्टी नव्हती. पृथ्वी थंड झाल्यावर भूमी उंगालने लोखंडाचा एक दोरखंड तयार करून पृथ्वीवर फेकला व त्याच्या सहाय्याने बहिणीसह तो जमीनीवर आला. तेव्हा तेथे प्रकाश नव्हता. भूमी–उंगालने आपल्या बरोबर सतत जवळ राहणारा अग्नी आणला होता. जेव्हा हे बहिण भाऊ बेटावर आले तेव्हाच पाण्याच्या खालून त्या बेटाच्या काठी दोन राक्षसासारख्या व्यक्तींनी जन्म घेतला. ते दोघे, राक्षस–उंगा व राक्षस उंगी हे बहीण भाऊ होते. दोघेही दिसायला महाभयंकर होते. भूमी उंगाल त्या बेटावर राहत होता. पण त्याला पाणी मिळत नव्हते. तो ज्या बेटावर राहत होता त्या बेटावर मोठमोठे दगड होते. दगडांच्या खाली लोखंडाच्या खाणी होत्या. ते लोखंड भूमीउंगालने काढले व ते दोरखंडावर टाकून ते दोरखंड त्याने पूर्व दिशेला फेकले व स्वत:कडे ओढले पण तो दोर ओला झाला नव्हता कारण पूर्व दिशेला पाणी नव्हते. त्याच प्रमाणे उत्तर व दक्षिण दिशेकडे तो दोर फेकला असता ओला झाला नाही. कारण तिकडे पाणी नव्हते. मात्र पश्चिम दिशेला दोर फेकला असताना मात्र मोठा आवाज झाला व त्याचा प्रतिध्वनी ऐकू आला. त्यावरून भूमी उंगालने तिकडे पाणी असल्याचे ओळखले व आपल्या बहीणीला, भांडे घेऊन पाणी आणावयास सांगितले. ती पाणी घेत होती तेव्हा राक्षस तिच्याकडे पहात होते. त्यानी तिला पकडण्याचा प्रयत्न केला पण तो सफल झाला नाही. भूमी उंगी पाण्याच्या भांड्यासह आपल्या भावाकडे पळत आली व भावाला म्हणाली, 'लवकर पाणी पी; माझ्या मागे राक्षस लागलेले आहेत. ते आपल्याला मारतील.' भूमी उंगाल पाणी पीत असतानाच राक्षस उंगा आला व त्यांची लढाई सुरु झाली.

राक्षस उंगी पण आपल्या भावा मागोमाग येतच होती. ती युद्धाच्या जागी येऊन पोहोचली. भूमी–उंगी तिला म्हणाली, 'तुझा नवरा माझ्या भावाला मारून टाकेल.' तेव्हा राक्षस उंगी म्हणाली, 'तो माझा नवरा नाही तर भाऊ आहे. आपण आपल्या भावांची लढाई थांबवू या. तू माझ्या भावाशी लग्न कर व मी तुझ्या भावाशी लग्न करते.' राक्षस उंगी भूमी उंगालकडे गेली व तिने त्याला दोन्ही हातानी धरले व उचलले आणि भुमी उंगी राक्षस उंगाकडे गेली व तिनेही त्याला दोन्ही हातानी उचलले व दोघींनीही तुम्ही आमचे नवरे आहात असे सांगितले व लग्न करण्याचे ठरविले.

भूमी उंगाल व राक्षस उंगी ह्यांचे प्रथम लग्न झाले व सर्व श्रम भूमी उंगीने घेतले व समारंभ साजरा केला. भूमी–उंगीने केशराचा टिळा आपल्या भावाच्या कपाळावर लावला व पाणी हातात घेऊन त्या दोघांच्या डोक्यावर टाकले. असाच समारंभ राक्षस उंगी व भूमी उंगीच्या लग्नाचा राक्षस उंगीने केला. दोन्ही जोडपी अशा रितीने राहू लागली पण तिथे उजेड व जीवसृष्टी नव्हती.

वरील कथेवरून पृथ्वीच्या निर्मितीसंबंधीची माडियांची कल्पना शास्त्र शुद्ध स्वरुपाची आहे हे लक्षात येते. लग्न समारंभाची जी पद्धत वर्णन केलेली आहे ती आजही तशाच स्वरुपात पाहावयास सापडते. जमीनीवर दगडाखाली खनिज पदार्थ सापडतात ही माडियांच्या पूर्वजाना माहिती असावी असे दिसते. तसेच भूमी–उंगाल ने पाण्याचा शोध असा लावला तेही मोठे मनोरंजक वाटते व त्यांच्या चातुर्याची चुणूक दाखविते.

## सूर्य–चन्द्र आणि तारे ह्यांच्या उत्पत्तीची कथा

देवरु मुईतोने दोन झाडे निर्माण केली. इलोड–मर्रा आणि पियोक–मर्रा ह्यांना सोने, चांदी, पितळ ह्यापासून बनविलेल्या तीन कुऱ्हाडीसह पृथ्वीवर पाठविले. मधल्या काळात, देवाना मुले झाली. त्या मुलांना देवरू मुईतोने नवनवीन वस्तू निर्माण करण्यासाठी पृथ्वीवर पाठविले, त्या मुलांची नावे 'पांडराजा, (महाभारतातील पांडवांशी साधर्म्य) कानाउंगाल, लिंगो, उसेमुरीया, विद्दुरीयाल, पाडहेडमल, चिकटराज, जेडेमाईदा, नंगवेला' अशी होती. हे देव जेव्हा पृथ्वीवर आले त्यावेळेपावेतो ती दोन झाडे पृथ्वीवर वाढलेली होती देवानी दिलेल्या तीन कु-हाडींनी देवाच्या मुलांनी ती झाडे तोडण्याचा प्रयत्न केला. पण त्या प्रयत्नात कुऱ्हाडीच तुटल्या.

मधील काळात भूमी उंगाल व राक्षस उंगी ह्यांना मुलगा झाला. त्याचे नाव 'नेल्ला–मन्ताल' (नेल्ला = चन्द्र, मन्ताल = निर्माण करणारा) नेल्ला मंताल मोठा झाल्यावर आपल्या वडिलांची कुन्हाड व सतत जणा जळणारा अग्नी घेऊन पृथ्वीवर आला. त्याला ही दोन झाडे दिसली. ती झाडे तोडून त्याने इलो

डमर्रा पासून मोठा व पियोक मर्रा पासून छोटा असे दोन तुकडे केले व ते आकाशात फेकले पण ते तुकडे खाली पडले. असा प्रयत्न त्याने बऱ्याच वेळेला केला पण ते तुकडे आकाशात लटकविण्यात त्याला यश आले नाही. तेव्हा त्याने देवरु मुईतोला विचारले, 'मी आता काय करावे?' तेव्हा देवरु मुईतोने सांगितले, जेव्हा त्या दोन तुकडयांच्या समोर बळी देशील तेव्हाच तू सूर्य चन्द्र निर्माण करू शकशील. तेव्हा नेल्ला मंताल ने लिंगोला सांगीतले की, तू बळी द्यायला दोघांना घेऊन ये तेव्हाच मी सूर्यचन्द्र निर्माण करू शकेन.' तेव्हा लिंगो देवाच्या राज्यात उडत उडत गेला आणि त्याने पुल्ला–केसा (देवाचा मुलगा) व दिराई गुंडे (देवाची मुलगी) ह्यांना पकडून नेल्ला–मंताल कडे आणले. नेल्ला मंतालने ज्या कुऱ्हाडीने झाडे तोडली होती ती कुऱ्हाड घेतली व दोन्ही मुलांच्या माना त्या कुऱ्हाडीने तोडून त्यांचा बळी दिला व दोन्ही तुकडे नंतर आकाशात फेकले. तेव्हा इलोडमर्रा पासूनच्या तुकडयाचा सूर्य तयार होऊन आकाशात चमकू लागला व अगदी हळू हळू खाली येऊ लागला तेव्हा अंधार पडला. पियोक मरा पासून केलेला तुकडा त्याने आकाशात फेकला- तेव्हा तो चन्द्रासारखा चमकू लागला. पण त्याचा प्रकाश फारसा, चकचकीत नव्हता. देवरु मुईतोने त्यांना आज्ञा केली की सूर्याने सकाळी यावे व चन्द्राने सायंकाळी यावे. त्याच प्रमाणे आजही चालू आहे. काही दिवसांनी चन्द्राचा आकार लहान होत आहे असे दिसून आले. कारण चन्द्राला नद्या कोरडयाच मिळाल्या आणि तो हळूहळू सूर्यांच्या मागे चालू लागला, व एका दिवशी नाहीसाच झाला. तेव्हा देवांनी सूर्याला विनंती केली की, 'रस्त्याने जात असतांना चंद्र दिसल्यास पहा' अन् खरेच सूर्याला चंद्र रस्त्याच्या कडेला मृत्यूपंथाला लागलेला दिसला. तेव्हा त्या मरणासन्न चंद्राला सूर्य म्हणाला, 'तुझी शक्ती वापरुन रस्त्यावर दिवे निर्माण कर व तुला पाणी मिळण्यासाठी नदी तयार कर आणि देवरु मुईतोच्या कृपेने तसेच झाले. ते आपण आजही पाहतो.

नेल्ला–मंतालला चंद्र–सूर्य निर्माण केल्या नंतर आणखी बऱ्याच गोष्टी निर्माण करावयाच्या होत्या पण ते काम देवरु मुईतोने पाठविलेल्या देवांच्या मुलांचे होते. पण त्यांना नेल्ला मंताल आपल्याला नोकर समजतो असे वाटले तेव्हा ते त्याला ठार मारण्याची संधी शोधू लागले. हे नेल्ला मंतालला कळल्या- बरोबर त्याने जमीनीत एक खड्डा खणला व त्यात तो लपून बसला. हे घडत असतांना पुल्ला केसा व दिरईगुंडा, या आपल्या मुलांना शोधण्यासाठी देव पृथ्वीवर आले तेव्हा त्यांना घडलेली हकीगत कळली. नेल्ला मंताल मात्र अदृश्य झाला होता.

वरील कथेवरुन प्राचीन काळापासून प्रकाश, अग्नी व लाकूड ह्यांच्या अन्योन्य संबंधाची जाणिव माडियांना होती असे दिसते. प्रकाशासाठी सूर्य व चंद्र

असून चंद्र हा सूर्यावर अवलंबून आहे हेही त्यांना माहित होते. तसेच पाणी व चंद्र ह्यांचा परस्परांशी काही तरी संबंध आहे हे देखील माहीत असावे. जीवनासाठी पाणी अत्यंत आवश्यक बाब आहे हेही स्पष्ट होते. तसेच बळी देण्याचे–नरबळी देण्याची पद्धतीही परंपरगत असलेली दिसून येते.

## झाडे व फुले ह्यांची निर्मिती

नंतर देवांनी इतर बऱ्याच गोष्टी निर्माण केल्या.

नंगवेला या देवाने पाऊस, नदी व तळी निर्माण केली. तर पडहेडमल ह्या देवाने झाडे, गवत व इतर वनस्पती निर्माण केल्या. तसेच मिकटराज देवाने जमिनीवर, जमिनीच्या आत, हवेत व पाण्यावर राहणारे प्राणी निर्माण केले.

अशा प्रकारे निर्मिती करून सर्व देव जंगलात अदृष्य झाले आणि प्रत्येक देव 'मुज्जा' (घंटीचे झाड) झाले. पृथ्वीवर भूमी–उंगाल, राक्षसउंगी व राक्षसउंगा–भुमीउंगी ही दोन जोडपीच राहात होती. देवरूमुईतोला ह्या लोकांनी त्यांच्या परवानगी शिवाय लग्न केले असल्याने क्रोध आलेला होता. त्याने एका मोठ्या अजगराला पाठविले. अजगराने त्या चौघानाही खाऊन टाकले व पृथ्वीवर कोणीच उरले नाही.

## मानवी प्राण्याची निर्मिती, गोत्र व देव-गटात विभागणी

काही दिवसानंतर देवरु–मुईतोने 'कुमूर–कोटा' पर्वतावर 'कुसूर–तोडा' वेली लावली. तिला पुष्कळ फळे लागली व ती पिकली. एका फळापासून एक ह्याप्रमाणे पुरुष व स्त्रियांची निर्मिती झाली. प्रथम जन्मण्याचा मान ज्याला मिळाला तो 'कुमूर राजा' झाला. लोकांची निर्मिती संख्या वाढली तेव्हा ओळख येण्यासाठी त्यांनी एकमेकांना नावे दिली. हे माणसाचे पहिले पूर्वज होते. नंतर ही माणसे एकमेकांपासून दूर पाच अलग अलग दिशांना निघून गेली. तेथे ज्यांना 'मुज्जा' (जंगलातील देव) सापडले. ते 'पेरमा' झाले. त्या पेरम्याच्या माध्यमातून देवरू– 'मुईतो' बोलू लागला व त्याने वंशाचा मूख्य पुर्वज आणि देवांची जागा दाखविली. गोत्र देव व देवाची नांवे सांगून देवांची विभागणी केली. हे वेगवेगळ्या पाच ठिकाणी घडले. सात, पाच, सहा, चार आणि तीन असे देव सापडले.

वरील गोष्ट ऐकत असताना पौष महिन्यात रविवारी सूर्यनारायणाची पूजा केल्यानंतर सांगण्यात येणाऱ्या आदित्य–राणूबाईच्या कथेची आठवण येते. त्यातही लाल भोपळ्यातून मुलाचा जन्म झाला अशी माहिती मिळते. कोणत्या तरी माध्यमातून देववाणी ऐकायला मिळते. ही श्रद्धा तर प्राचीन काळापासून चालत आलेली आहे. देवाचा कोप हा विनाशकारी असतो. देवाच्या मनाविरुद्ध गोष्टी करू नये अशी श्रद्धा तर आपल्यालाही नवीन नाही.

**श्रम विभागणी (व्यवसाय)**

कुमूर राजाच्या राज्यात मनुष्य प्राणी राहत होते. त्यांना राजाने कामाची विभागणी करून दिली. काहींना गुरे राखण्यास सांगितले त्यांना 'कोपाल' (कोंदा पासून) म्हणू लागले. इतरांना मातीची भांडी करण्यास सांगितले. त्यांना 'कुमाल' म्हणू लागले. मासे पकडणारे जे होते ते 'झारे' (झारिया–'झारामीन) झाले. ह्याच काळात अग्नी अदृश्य झाला. तेव्हा ज्यांना काहीच काम नव्हते, त्यांना अग्नी शोधून आणण्यास पाठविले व अग्नी न आणल्यास देहदंडाची शिक्षा देईन अशी आज्ञा दिली. त्या लोकांना शोधुनही अग्नी सापडेना तेव्हा त्यांनी बोकाल–माडुची भक्ती केली व मदत मागीतली. तेव्हा बोकाल–माडु मनुष्य रुपाने आला व महासमुद्रासारख्या दिसणाऱ्या इंद्रावती नदीच्या काठी थांबला. तेव्हा एका मोठ्या माड्याने सागितले की, 'पोवूर झाडाकडे (Baninia Vahlii) जा. त्या झाडाच्या ढोलीत अग्नी सापडेल. पोवूरच्या लाकडाचा अग्नी विझत नाही तो लोकांना काढून दे.' त्याने लोकांना अग्नी काढून दिला व पुन्हा कसा मिळवावा हेही सांगितले. त्या लोकांनी कुमूर राजाला अग्नी आणून दिला तेव्हा राजाने खूष होवून त्यांना जमीनी दिल्या व ते भूमिया झाले. काही लोकांना चाकू व कुऱ्हाडी बनविण्यास सांगितले ते कम्मरी बनले. काहींना धातूची भांडी बनविण्यास सांगितली ते 'ओतनकार' झाले. अशा रीतीने राजाने प्रत्येकाला काम व व्यवसाय वाटून दिला. तेव्हापासून प्रत्येकाला ते काम करावे लागते.

वरील कथेवरुन समाजाला आवश्यक गोष्टी व शांततेसाठी कामाची विभागणी आणि हे करणारा एक, प्रमुख अशी साखळी आढळते. मातीची भांडी करणारे, गाईगुरांची काळजी घेणारे, लाकडे तोडण्यासाठी अवजारे बनविणारे व शेती करणारे अशा गटात लोकांची विभागणी झाल्याने समाजपुरुष शांततेने कालक्रमण करू लागला. नवीन घडी बसवितांना जीवनासाठी आवश्यक असे हे व्यवसाय आहेत. राजाने नेमून दिलेली कामे ते आजही करीत आहेत. ह्यावरून गीतेतील शिकवणीचीच आठवण होते.

ह्याशिवाय वरील विविध प्रकार मौखिक परंपरेने चालत आलेले असले तरी त्या कथांमधील व्यक्ती, सृष्टीविषयक इतर नावे आणि कथेतील कल्पना ह्या शब्दरुपाने जेव्हा साकार होतात तेव्हा बोली समृद्ध बनत जाते. म्हणजेच वाङ्मय निर्मिती आणि बोलीचा विकास दोन्हीही यामधून साधतात.

## शौर्यकथा

* काही शूर माडियांनी वाघाशी शूरपणे सामना दिला त्या सत्यकथेवर आधारित पुढील शौर्यकथा.

२६ डिसेंबर १९६० ची मध्यरात्र. एक नरभक्षक वाघ कोयरच्या वसाहतीजवळ आला. वाघाची चाहूल लागताच लोकानी आरडाओरडा करून त्याला पळवून लावले. त्यानंतर वाघाची स्वारी वळली मुरंगलकडे. त्याच वेळेस सोमी घराबाहेर आली होती. वाघ दबा धरून बसलेला होताच. सोमी त्याचे भक्ष्य बनली. सकाळच्या प्रहरी सोमीच्या सासऱ्याला दस्सा मुरा माडियाला—जेव्हा सून दिसली नाही तेव्हा गावातील लोकांबरोबर त्याने शोधाशोध केली. ते १०० ते १२० यार्डावर सुनेचे प्रेत त्याला आढळले आणि तेथेच दबा धरून बसलेल्या वाघाने अनपेक्षितपणे त्या लोकांवर झेप घेतली व वाघाच्या रक्तपिपासेला दस्सा मुरा बळी पडला. बाकीचे कसेबसे जीव घेऊन पळाले. अरपा दस्सा स्वरक्षणार्थ झाडावर चढला तो वाघ त्याला काही केल्या जाऊ देईना. नंतर पळून गेलेल्या लोकांनी आणखीन काही लोकांना मदतीला घेऊन वाघाशी झुंज दिली. त्यात दुगा कट्टा, पेंदा गुडसा व गोडी दस्सा ह्यांनी मोठ्या शर्थीने वाघास ठार केले. जखमी झालेल्यापैकी पेंदा गुडसा पुढे मरण पावला.

या प्रसंगी प्रत्यक्ष नर भक्षक वाघाशी नुसत्या कुऱ्हाडी व भाले ह्या शस्त्रांनी झुंज देऊन ज्यांनी असामान्य धैर्य दाखविले व वाघाला मारले त्यांचा शासनातर्फे गौरव करण्यात येऊन त्यांना बंदुका देण्यात आल्या.

ही शौर्यकथा अलीकडे पूर्वजांची शौर्यकथा म्हणून सांगण्यात माडियांना अभिमान वाटतो. अशा अनेक शौर्यकथा स्थानिक परिसरात प्रचलीत आहेत. बोली भाषेत वीररसाचा अंतर्भाव करण्यात या कथांचा महत्वाचा भाग आहे नवीन पिढीला प्रोत्साहित करणे आणि त्याद्वारा आपल्या जमातीला संरक्षण प्राप्त करुन देणे असा दुहेरी कार्यभाग ह्यातून शक्य होतो. प्रस्तुत लेखिकेच्या मते ह्या शौर्यकथांचा वास्तवतावादी आधार लक्षात घेता, लोककथांमधील एक उपप्रकार म्हणून त्याला महत्व देणे आवश्यक आहे. मृतांची स्मारके म्हणून जे दगड (कलबंडा) उभारण्यात येतात त्यांच्यावरही पूर्वजांना प्रिय असलेल्या शस्त्र किंवा अस्त्राची लाकडी प्रतिमा किंवा त्यांनी शिकार करून मारलेल्या प्राण्याचे शिर अगर प्रतिमा ठेवतात व त्या अनुषंगाने त्यांचे शौर्य पुढील पिढ्यांना सांगण्यात येते. 'वाघोबा' हा देव म्हणजे वाघाशी झुंज देऊन मेलेल्या पूर्वजांचा आत्मा असून तो वाघाला पळवून लावून इतरांना संरक्षण देणारा देव मानण्यात येतो. मग त्या वाघोबाच्या शौर्याच्या गोष्टीपण ऐकायला मिळतात. शौर्यकथांचे संकलन व त्याचा इतिहास गोळा करणे हे एक स्वतंत्र संशोधन क्षेत्र करावयाला हरकत नाही.

## धार्मिक कथा

माडिया जमातीत पूर्वपरंपरेने चालत आलेली पेरसापेन किंवा फेरसापेन–मोठा देव किंवा बडा देव पूजनाची परंपरा आज पावेतो अस्तित्वात आहे. धार्मिक, पौराणिक कथानके तत्व विचार आणि विधी संस्कार वगैरेचे जे शास्त्र आहे ते आजही पाटाडींच्या जिव्हाग्री आहे. खालील धर्मकथा अशाच सकलनाचा परिपाक आहेत. 'पेन' म्हणजे देव. स्थानिक देवदेवता विविध व अनेक आहेत. पण केवळ माडियाच नव्हे तर गोंडाच्या सर्व उपजमातीमध्ये सर्व पुजित असे दैवत म्हणजे शिव. (आणि अर्थातच पार्वती आणि तिची रुपे) त्यांचाच उल्लेख 'पेरसापेन व गिरीजाल' देवी या नावानी धार्मिक कथांमधून आढळतो.

### फेरसापेन उर्फ बडादेवाच्या कथा

गोंड लोकांमध्ये त्यांच्या पूर्वजापासून चालत आलेल्या ' फेरसापेन पुजनाची जी परंपरा आज पावेतो अस्तित्वात आहे तिच्यात पुढील कथेला फार महत्व देण्यात येते.

### काली देवीचा जन्म 12

जुगाद राहूड दाऊ (वडील) आणि सोनदेवी अव्वाल (आई) ह्यापासून काली कंकाली देवीचा जन्म झाला. काली अत्यंत सुंदर होती. ती दिवसेंदिवस चंद्रकलेप्रमाणे वाढू लागली. तिचेच बालकौतुक करण्यात आणि बाललीला पहाण्यात यादराहूड तादोचे दिवस आनंदात जाऊ लागले. एके दिवशी ती समुद्रस्नान करीत असताना यहवेला व बोधीवेला ह्यांच्या पडछाया पाण्यात पडलेल्या पाहुन ती मोहीत झाली व त्या पकडण्याचा प्रयत्न करू लागली. पण त्या कशा सापडणार ! मात्र त्यामुळे तिच्या सत्वात फरक पडला व यादराहूड तादोने तिला 'वरवाये–कुरवा'–म्हणजे वरवाकोट येथे तपाचे आचरण करण्यास जायला सांगितले.

तपश्चर्येसाठी घोर वनाचा मार्ग क्रमीत असता तिला अत्यंत प्रबळ इच्छा झाली व त्या इच्छेच्या प्रभावाने तिने पारंडका कोयापेन (बाराकोट हिंसक गोंड संतती) आणि पारंडकला बोंबळापेन (बारा कोट अहिंसक गोंड संतती) निर्माण केली व ती तेथेच टाकून ती पुढे वनात निघून गेली.

पुढे एके दिवशी भगवान फेरसापेन व देवी गिरजाल शुभ्र 'सांडा' वर आरुढ होऊन सृष्टीचे निरीक्षण करीत असतांना बालकांच्या रडण्याचा आवाज देवीच्या कानावर पडला. तेव्हा देवीने भगवानांना तिकडे चलण्याची विनंती केली. तेव्हा भगवान म्हणाले, ' देवी ती काली कंकालीची संतती आहे. त्यापासून

---

१२ तोडासे, एम. जे. धार्मिक कथा–बडादेव दर्शन, फेरसापेन पुजा, आदिवासी साहित्य प्रकाशन मंडळ, चांदा (चंद्रपुर), १९५६, पृ. १ ते ५

पुढे अ.पणास त्रास होईल. तरीही हट्टाने तिकडे जाऊन देवीने त्या सततीचे पालन केले. आश्रमात हिंसक संततीला उजव्या स्तनाचे दुध देवी गिरजाल पाजू लागली, तेव्हा तिचा उजवा भाग सुकू लागला. तेव्हा देवीने त्यांना विनंती केली की, ह्यांना अन्नाचा आहार सुरु करावा. भगवानांनी 'किसपेन' म्हणजे अग्नी-देवाची प्रार्थना व स्तुती करून त्याचे कडून पंचपक्वान्न तयार करून दोन पंगतीस भोजन दिले

मांसाहारी व शाकाहारी अशा दोन पंगती केल्या व मांसाहारी संततीला भात, वरण व शाकाहारी संततीला मांसाचे पदार्थ वाढले तेव्हा कोणीच सुरुवात करेना. तेवढ्यात दोन्ही पंगतीच्या मधून भगवानानी 'खार' सोढली व ती चर चर आवाज करीत गेली तेव्हा मांसाहारी भोजन करणारे 'शिकार'—शिकार म्हणून तिच्या मागे धावले व एका मोहाच्या झाडाच्या ढोलीत तिच्या मागोमाग घुसून व पाण्याची आयतीच तयार झालेली दारू पिऊन नशेत बाहेर आले. तेवढ्यात शाकाह रींचे भोजन आटोपले होते व मांसाहारींचेही भोजन झाले. दुसऱ्या दिवशी भगवानांनी पंचपक्वन्नाचे शाकाहारी भोजन करण्यास सांगितले तेव्हा हिंसक संतती 'आम्हास तुमचा सांड कापून भोजन द्या' म्हणून अडून बसले व हट्ट करू लागले.

तेव्हा भगवानांना अतिशय वाईट वाटले व ही हिंसक संतती जगाला त्रास-दायक होईल. जीवजंतु ठेवणार नाहीत म्हणून त्यांनी 'सिंगार' द्विपातील चार गुहांपैकी 'आअुटबंडा' गूहेत त्या संततीला कोंडले व त्या गुहेवर फर्लांगभर लांबीचा दगड झाकण म्हणून ठेवला व तेथे रक्षणार्थ गरुड पक्षी पाहारेकरी नेमला· ह्या पक्षाची नेमणूक वडापिंपळाच्या महावृक्षांवर केली. इकडे शाकाहारी संततीची उत्तरोत्तर भरभराट झाली.

## देवदूत पाहडी कुपार लिंगो–

वरवाकोट येथे पाहडी कुपार लिंगो भविष्यवेत्ता होता व त्यास काली कंकाली देवीच्या संततीचा विस्तार होईल हे माहित होते. तेव्हा तो बडादेव भक्त चारही दिशा फिरत सृष्टीची पाहाणी करीत 'डेमाडिक' म्हणजे उत्तर दिशेला आला. तो त्यास सर्वत्र शाकाहारी संततीचीच बोलवा ऐकू येऊ लागली तेव्हा त्यानी मनात बडादेवाचे स्मरण केले व त्यास मांसाहारी सततीबद्दल विचारले. तेव्हा देवाने सांगितले की, 'कल्लीकुट्ट अक्को' व 'पद्मालपुरी काको' आपल्या आश्रमात कीईग म्हणजे पश्चिमेस जात आहे. तेव्हा त्यांच्या बरोबर तू जा म्हणजे तुला सर्व वृत्तांत ते कथन करतील.

देवाच्या आज्ञेप्रमाणे जात असतांना 'कुर्वादिप' येथे त्यांची भेट झाली तेथे कलीपुट अक्कोस नमस्कार करून कुपार लिंगोने आपल्या जंतुराच्या वाद्या

वर 'सोळा काठी अठरा ढेमसे' गाऊन एका पायावर उभे राहून किर्तन निरुपण केले तेव्हा संतुष्ट होऊन कलीपुट अक्को व पदमालपुरी काकोने हवे ते मागण्यास लिंगोस सांगितले तेव्हा लिंगो म्हणाला, महाराज मला राज्य नको, धनद्रव्य नको, मला कालीकंकाली देवीच्या संततीचा पत्ता सांग' तेव्हा कलीपूट अक्को म्हणाले, 'येथून कुर्वाद्विपाचे सरहद्दीत गंगा बोरी रेंगा नावाचा बारा महिने गोड फळे देणारा महावृक्ष आहे. त्याची फळे खाऊन तू शांत हो व शृंगार द्विपाच्या सरहद्दीवर वडापिंपळाच्या महावृक्षावर एक गरुड जोडपे आहे; जे द्वारपाल आहे तेथे निलकोंडा पर्वताचे मुख आहे. तेथे आऊटबंडा गुहेत मांसाहारी संतती कोंडलेली आहे. त्यांना सोडविणे कठीण आहे. तुझ्यात जर सत्व गुण असेल तर त्यांची सुटका करता येईल. नाहीतर तुला प्राणास मुकावे लागेल."

## 'सिंगार' द्वीपात प्रवेश

"सिंगार" द्वीपाच्या सरहद्दीत कुपार लिंगोने पर्वतामागून पर्वत ओलांडून घोर अरण्यातून मार्ग आक्रमण करून प्रवेश केल्यानंतर त्याला गंगाबोरी रेंगाचे, फळांच्या भाराने झुकलेले झाड दिसले. त्या मधूर फळांनी त्याने आपली भूक शांत केली व आनंदाने बोरीच्या काट्यावर उभे राहून दुसऱ्या पायाची आढी देऊन जंतुर वाद्याच्या सहाय्याने 'सोळा काठी अठरा ढेमशाचे' वर्णन गाऊ लागले.

लिंगोच्या गायनाने खुष होऊन 'कोसवेन रायताल' म्हणजे जंगोदेवी लिंगोच्या शुभ्र फेट्यावर लटकू लागली. पाठीमागून आली म्हणून कुपार लिंगोने तिला आपली धाकटी बहीण समजून 'मी पारंडकळा कोयापेन संततीची सुटका करावयास जात आहे.' असे सांगितले. तेव्हा जंगादेवी म्हणाली, 'दादा, तू निमित्यास कारण आहे पण जे करावयाचे ते शक्ती वाचून होत नाही म्हणून मला फेरसापेन देवाने पाठविले आहे. तेव्हा आपण बहीण भाऊ मिळून कोयापेन संततीची सुटका करु' अशा प्रकारे ठरवून दोघेही वडा-पिंपळाच्या झाडाखाली गेली. तेथे त्यांना गरुडाची पिल्ले रडताना दिसली. तेव्हा जंगो देवीने ही योग्य वेळ आहे, असे समजून एक एक मणाचा डिंकाचा गोळा करुन पिल्लाच्या तोंडात कोंबून त्याची तोंडे बंद केली व दोघेही बहिणभाऊ लपून गरुड जोडप्याची वाट बघू लागली.

त्याच वेळेस गरुडाच्या पंखाचा 'सो-सो' आवाज येऊ लागला व वृक्षही हादरु लागले. भक्षाचे मांस जेव्हा गरुड पक्षी पिल्लाच्या चोचीत घालू लागले तेव्हा पिल्लांची तोंडे बंद पाहुन निराश होऊन ती दोघे इकडे तिकडे पाहू लागली. त्यांना लपलेले दोन मनुष्य प्राणी दिसताच मोठ्या वेगाने त्यांच्या अंगावर झडप घालण्यासाठी गरुडपक्षी येताना पाहून जंगो देवीने भावास बाण मारावयास सांगितले. गरुड नर व मादी ह्यांच्या वर्मी बाण लागून ते दोघे जखमी होऊन पडले. तेव्हा बड्या देवाचे स्मरण ते करु लागले. ते जंगो लिंगोस म्हणाले,

'हे महापुरुषा, आम्हास बाणानी मारणारे आपण कोण?' तेव्हा जंगो देवी व लिंगो सांगू लागले की, आम्ही वरवाकोट व कोटापरंडुलीचे राहणारे जंगो व लिंगो आहोत. तेव्हा, त्यांना आम्हाला मुक्ती द्या, अशी विनंती गरुड पक्षांनी केली. तेव्हा जंगो लिंगोनी गरुड पक्षास टटास म्हणजे निळकंठ पक्षी योनीत व त्यांच्या पिल्लांना सुईपिट्टे म्हणजे सुई पक्षाच्या योनीत जन्माला घातले व शकुनाचा आधार दिला.

ह्याप्रमाणे गुहेच्या द्वाराला नमस्कार करून 'जंतुरावर सोळा काठी अठरा ढेमसे' आणि सोळा वरव्याचे गायन करुन विविध पुजा करुन कोयतूर संततीस तोषविले.

बंदीवान संतती अगदी शुष्क झाली होती. पण लिंगोचे किर्तन ऐकून बंद दार उघडण्यास हातभार लावून 'जोहार लिंगो ह्या जय घोषाने कोयापेन संतती बाहेर आली.

तेव्हा कोटापरंडुली येथे जाऊन आसरा कसा येथे स्नान करून जलदेवतेची पुजा केल्यावर जंगो देवीने नवी डाळ, नवे तांदूळ, नवी भाजी, नवी हळद, नवे तेल देऊन स्वयंपाक करावयास लावला व नैवद्य तयार झाल्यावर सुग्रास पडयाचा सुजारा म्हणजे उत्तम गाईचा यज्ञ करून भोग देऊन ते भोजनास बसले.

त्यानंतर मुक्ततेनिमित्त त्यांनी 'सोळा काठी अठरा ढेमस्याच्या तालावर नृत्य करून जंगो लिंगोचा जयघोष केला व दुसऱ्या दिवशी मंडा-गाजली' म्हणजे मावंद उरकून घेतले.

त्यानंतर जंगो लिंगो देवाने त्यांना देवाची वाटणी, लग्नसंबंध, शाखा प्रत्येक शाखावाल्यांची घरे, त्यांच्या कुलदैवतांची नावे, गोत्रज, वंश व कूल, तीर्थ-यात्रा या संबंधीच्या नीतिनियमांची आखणी करून दिली व त्याप्रमाणे आचरण करण्यास सांगितले.

उभयता बहिण भावांनी मिळून लालीपाटा, जाहिलीपाटा व बोधीपाटा व वारसी इ. गाणी गाऊन किर्तन, निरुपण केले.

**बडादेव दर्शन—**

बडादेव पुजेची काळजी करणाऱ्या कोयतूर मंडळींना एकदा कुपार लिंगोने बडादेव पुजेची तयारी काय? सामुग्री कोणकोणती, असा प्रश्न विचारला तेव्हा धन्ने गावातील कोणालाच याचे उत्तर देता आले नाही. तेव्हा कुपार लिंगो म्हणाले तुम्ही चार शाखेवाले आहात. तुम्हाला चार बिरादर सल्ले पाहिजे. पाचवी शाखा जंगोदेवीची आहे. तीच त्यांची मालकीण आहे. तुम्ही चार बिरादर सल्ले आणावे म्हणजे तुमचे देव मोठे होतील.' तेव्हा ही कोयतूर मंडळी आणखी चितातूर

होऊन विचारू लागली की, आम्ही चार बिरादर सल्ले कोठून आणावे?' कसे आणावे?' तेव्हा लिंगो म्हणाले, 'तुम्ही गिरीशिखरावर भगवान बड्या देवाची आज्ञा घेऊन या व त्यासोबत चवरी, अबदागिरी, डांका, निशाण, मोरछळ मेघडंबर, सूर्यपान व जरीपटका इ. देवांची शोभा वाढविण्यात आणावे.

त्याप्रमाणे चार शाखावाले मंडळीनी सोळा काठी अठरा ढेमसे गाऊन जंगो लिंगोची काठी गिरीशिखरावर लावून तन-मनाने फेरसापेन देवाचे दर्शन घेतले व येण्याचे कारण सांगितले. बड्या देवाने संतुष्ट होऊन देव घेऊन जाण्यास आज्ञा दिली. हिरासुका पाटाडी ह्या महाभक्ताच्या सहाय्याने सल्लेदेव धन्ने गावास कोइतूम मंडळींनी आणले.

मुरा मंडली (आखरावर) पोहोचताच हिरासूका पाटाड्याने प्राणांची आहूती दिली. तेव्हा चार शाखेवाले निराश झाले पण सात पडासना करून देवाची प्रार्थना व पूजा करून स्थापना केली व मोठा यज्ञ केला व देवाचे मोठेपण सल्ले देवाच्या सानिध्याने प्रप्त करून घेतले.

ह्या धार्मिक कथांमधून बोधप्रद गोष्टी सांगण्यात आलेल्या आहेत अनेक धार्मिक विधीची व रितीरिवाजाची माहिती त्या त्या ठिकाणी देण्यात आलेली आहे. माडिया लोक देव-देवतांची पूजा करणारे आहेत हे वरील कथावरून लक्षात येईल. त्यांचे बहुतांश देव लाकडी असून झाडांवर बांधलेले असत. बहुधा एक विवक्षित झाड देवासाठी राखून ठेवलेले असते. ते जणू काही त्यांचे देऊळच होय अशा झाडावर देव बांधून ठेवण्यात येतात. क्वचित प्रसंगी एखाद्या विशिष्ट झोपडीमध्ये किंवा राहत्या घराच्या खोलीमध्ये देव बांधलेले त्रिशुळ, लोखंडी खिळे किंवा लोखंडी साखळयांचाही देवाचे प्रतीक म्हणून वापर करण्यात येतो. लग्न समारंभात लाकडी कोरीव खांबांचे महत्व असते. ते पूर्वी सांगितलेच आहे. यावरून हे लक्षात येते की, ज्या जंगलात ते राहातात आणि ज्या जंगलावर त्यांचे जीवन अवलंबून असते. त्या जंगलात संपत्तीचे प्रतीक म्हणजे झाड किंवा लाकूड हे त्यांच्या देवतेची 'मूर्ती' किंवा 'प्रतीक' ठरले आहे.

धार्मिक कथांवरून असे दिसते की, महादेव आणि महाकाली ही त्यांची सर्वश्रेष्ठ दैवते होत. त्याचप्रमाणे त्यांच्या पूर्वजांच्या जीवनपद्धतीवर आणि वैगुण्यावर प्रकाश टाकणारी अशी ही धार्मिक कथानके होत. हिंसा आणि मांसाहार भौतिकतेची लक्षणे होत. ह्या दोन्ही गोष्टींचा अतिरेक झाल्याने महादेवाने त्यांना तुरुंगवास दिला आणि त्यातून मूक्ती मिळाल्यावर व्यवस्थाबद्ध पद्धतीने त्यांची वाटणी करण्यात आली व त्यांना नियमांचे बंधन स्वीकारावे लागले.

त्यांच्या सामाजिक व सांस्कृतिक जडणघडणीची छाप धार्मिक कथांमध्ये आढळून येते. वर्षानुवर्षे धार्मिक दृष्टचा उपयोगात आणण्यासाठी गायली जाणारी कथानकप्रधान गीते उदा. 'सोळा काठी अठरा ढेमसे' इत्यादी गोष्टी बोलीभाषा चालू राहण्यासाठी इतकेच नव्हे तर ती समृद्ध होण्यासाठी उपयोगी ठरल्या आहेत.

काही विशिष्ट शब्दांचा विचार केल्यास तेलगू बरोबरच मराठीचाही प्रभाव जाणवतो. उदा पेन (माडिया) = देव (मराठी) हा शब्दच दाक्षिणात्य आहे. 'सात पडासना' म्हणजे सात वेळा नमस्कार ह्या शब्दप्रयोगात सात ह्या मराठी शब्दाचा अंतर्भाव झालेला आढळतो.

अशा प्रकारे त्यांची सामाजिक आणि सांस्कृतिक वैशिष्टये धार्मिक कथानकातून तर प्रकट होतातच परंतु बोलीला पाठांतराने आणि नवीन पिढीला मौखिक पद्धतीने मुखांतरीत करण्यासाठी 'धर्म' हे एक प्रबळ कारण ठरले असे म्हणावे लागेल. शब्दसमृद्धी देखील त्यामुळे विकास पावली.

**तत्सम देवता :-**

माडियांच्या देवदेवता इतर गोंडांशी जुळतात. त्यांच्या प्रमाणेच धार्मिक कथांमध्ये गोंड, बेगा इ. अनेक जमातींच्या देवदेवतांची छाननी केली असता असे आढळून येते, की त्या त्या जमातीतील महापराक्रमी पूर्वज देव पदवीला पोहोचलेत. मृतपूर्वजांची पूजा हा धर्माचा एक महत्वाचा भाग दिसतो.

गोंड जमातीच्या बडादेवाची उद्‌बोधक परंपरा आहे. बडादेव म्हणजे मोठादेव, गोंडाचा सर्वात मोठा देव. मध्यप्रदेशातील आदिवासी जमात बडादेवाला परमपुरुष किंवा 'पहिला मानव मानतात.' कधी सूर्यदेव, कधी गृहदेव तर कधी पहिला कुलपुरुष म्हणून त्याची भक्ती होते. बडा देवाची बंगाल सिंगभूममधील गोंडापासून तो मध्यप्रदेशातील गोडाच्या देवापर्यंत त्याची पूजा होते. गोंडाशिवाय बेगा, आगरिया, परधान ओझा, मझवार मारिया, धासिया, हळबा, गोवारी, भरिया, देवार, धनुदार व खोंड ह्या जाती पण बडादेवाला मानतात.

बडादेवाला विविध नावे आहेत. त्यातील काही पुढील प्रमाणे आहेत. चन्द्रपूर जिल्ह्यात फारसापेन किंवा फारशीपेन किंवा पेरसापेन म्हणतात. फारशीपेन म्हणजे परशुदेव (युद्धाचा देव)

भंडारा शिवणी ह्या भागात गगरादेव (घंटेचा देव) तर बस्तर मधील माडिया गोंडांत भैरा पेन म्हणतात.

ग्रिगसनच्या मते बरा-बुडा-बुढा ही 'भैरा' ह्या गोंडी शब्दाची हिंदी विकृत रुपे आहेत. भेरा हे माडियातील बेहरा = मोठा ह्या शब्दाचे ब+ह = भ होऊन झालेले रुप असावे.

ओरीसातील गोंड व इतर आदिवासी बडीयालपेन म्हणतात.

छोटा नागपूर, खारिया उराव व खोंड 'बिरी' बेरा, गोसाईन व बरु पेन्नु म्हणतात. ओरिसातील खोंड लोक बुरा पेन्नु किंवा सूर्यदेव म्हणतात.

बडादेवाच्या अनेक आख्यायिका सापडतात. फार दुर्मिळ व तुकड्यांच्या स्वरूपात ह्या कथा असून परस्पर विरोधी असतातत. रायपूर, बिलासपूर आणि इतर भागात–बडादेव हा मुळचा मनुष्य असून त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या आत्म्याला देवत्व किंवा मोठेपण प्राप्त झाल्याचे दिसून येते.

सामान्यतः आदिवासी धर्मांची आपणास काही वैशिष्टे जाणवतात. त्यातूनच धार्मिक कथांची निर्मिती झाली असावी. माडियांच्या बाबतीतही ही वैशिष्टये प्रकर्षाने टिकून राहीलेली आढळतात.

१) आदिवासी हे सतत निसर्गाच्या सान्निध्यात वावरत असतात. निसर्गाचे जसे शांत व सौम्य स्वरुप त्यांच्या नित्याच्या परिचयाचे असते तसेच निसर्गाचे रौद्ररुपही त्यांनी बघितलेले असते. त्यातूनच ते निसर्गपूजक झाले. 'निसर्गपूजा' हे त्यांचे प्रमुख वैशिष्टय म्हणावे लागेल.

२) त्यांच्या अनेक धार्मिक विधीतून मद्यपानास देण्यात आलेले महत्वाचे स्थान विचार करण्याजोगे आहे. आपल्या वेदकालीन 'सुरापाना'चेच हे आंशिक स्वरुप असावे. प्राण्याचा बळी देऊन देवतांना प्रसन्न करून घेणे हे या मांसाहारीच्या देवतापुजेचे एक प्रमुख अंग होय.

३) तसेच पिशाच्च योनीवरील त्यांच्या अतूट श्रद्धेमुळे अदृश्य अशा हानीकारक व दुष्ट शक्तीना घाबरून ते सतत 'पुजारी' किंवा 'पेरम्याची' मदत घेत असतात.

धार्मिक कथामध्ये अशा भावनांचे मधून मधून प्रतिबिंब उमटलेले दिसते. मागासलेले व अशिक्षित असूनही त्यांच्या उत्पत्तीविषयक कथावरून निसर्ग निर्मितीसारख्या गूढ बाबींवरही माडिया परंपरागतरित्या विचार करीत आलेले आहेत हे स्पष्ट होते. पृथ्वी, चंद्र, सूर्य, तारे, नद्या, वृक्ष, खनिजे इ. भौतिकच नव्हे तर स्त्री–पुरुष, कुटुंब समूह गोत्र–गट आणि व्यावसायिक गट इ. सामाजिक गोष्टींचा निर्मितीचा इतिहासच या कथांमधून ध्वनीत होतो. केवळ मौखिक परंपरेने चालत आलेल्या व बोलीरुपात जतन झालेल्या या लोककथा धार्मिक कथेचे रुप घेऊन (Religious Mythology) माडिया बोलीची सांस्कृतिक सधनता, दर्शवितात आणि त्यांच्या समाज–निर्मितीचा व समाजव्यवस्थेचा स्थूल मानाने इतिहासही प्रकट करतात.

० ०

# विभाग तिसरा

# प्रकरण आठवे

## – माडिया गोंड जमातीचे सामाजिक व सांस्कृतिक जीवन–
## – काही सामाजिक व सांस्कृतिक संस्थांचा परिचय –

### अतिमागास (primitive) जमात माडिया–गोंड

चंद्रपूर जिल्ह्यात ज्या अनेक आदिवासी जमाती आहेत. त्यापैकी सगळ्यात मोठी आणि ऐतिहासिक व वांशिकदृष्टया महत्वाची जमात गोंड ही होय· अनेक शतके सत्ताधारी आणि प्रभावी वांशिक गटाच्या रुपात या विभागात ह्यांचा निवारा असून, अजूनही त्यांची राजघराणी आढळतात. हे गोंड लोक-संख्येच्या १५ टक्के असून त्यांच्यामध्ये चार पोटभेद[1] आहेत. १) राजगोंड २) मारिया-गोंड ३) धुर्वे ४) खातुलवार गोंड शिवाय काही अगदी लहान उपजमाती असून त्यापैकी कोया आणि गायता हे थोडे जास्त प्रमाणात आढळतात. माडिया गोंडांच्या मध्येही गायता हा प्रकार असून सामान्यतः खेड्यातील मुख्याला किंवा पाटलाला गायता संबोधितात. ह्या सर्व उपजमाती गोंडी बोलतात. पण गोंडीच्या विविध बोली. त्यामध्ये आढळतात. प्रत्येक बोलीवर लगतच्या भाषेचा प्रभाव आढळतो. व त्यामुळे त्यांना परस्परांची बोली पूर्णपणे समजण्यास अडचण निर्माण होते. गोंडांमधील गायता आणि कोया ह्या दोन उपजमातींनी अजून बऱ्याच गोंडी प्रथा टिकवून ठेवल्या आहेत. 'कोया' हा शब्द 'कोईतूर' (माणूस) ह्यापासून आलेला आहे. असे समजण्यात येते. चंद्रपूर जिल्ह्यात गोंड जमातीत राजगोंड आणि माडिया गोंड हे सर्वात मोठ्या प्रमाणावर आढळतात.

पूर्वी अहेरी जमीनदारी संबोधिल्या गेलेल्या विभागापैकी सिरोंचा तहसीली अंतर्गत एटापल्ली पंचायत समितीमध्ये एटापल्ली व भामरागड हे दोन विकास

---

1 Gazetteer of India Maharashtra State Gazetteers, Chandrapur District, Director of Publications, Maharashtra State, Bombay (Revised Edition) 1973, P. 167

खंड अर्भूतत होतात. ह्या दोन्ही विकास खडात प्रामुख्याने भामरागड विकास खंशात–ही माडिया जमात केन्द्रित झालेली आहे. ह्या माडियामध्ये लाहेरी टेकड्यांवर राहणारा व अजून फारच मागास अवस्थेत असलेला बडा–माडिया, आणि भामरागड व इतर सपाट प्रदेशातील अरण्यात राहणारा छोटा–माडिया, हे दोन पोट भेट पडतात.2

माडिया हे अत्यंत घनदाट अरण्याच्या विभागात वस्ती करून राहतात आणि त्यांचे जीवन हे बरेच रानटी व नैसर्गिक आहे असे म्हणावे लागेल. त्यांची खेडी अरण्यातील खूप आतल्या विभागात असून एखाद्या नदीकिनारी, नाले किंवा ओढयाच्या किनारी असतात. सामान्य व किरकोळ बांध्याचे पण सुदृढ शरीर असलेले आणि चटपटे दिसणारे असे पुरुष असून, स्त्रियाही ठेंगण्या, सुदृढ सावळया व अंगावर खूप गोंदण केलेल्या तुकतुकीत कांतीच्या असतात. नाके बसकट व थोडी चपटी असून डोळे तेजस्वी असतात. अत्यंत कमी कपडे वापरणारे हे लोक असून पुरुष फक्त लंगोटी लावतात. कधी कधी धोती किंवा कपडा कमरेला गुंडाळतात तर स्त्रिया काठाची लुगडी किंवा टॉवेल कमरेला गुंडाळतात. चोळी किंवा ब्लाउझ वापरीत नाहीत. विवाहित स्त्रीला चोळी वापरण्याची पूर्ण मनाई आहे. माडिया स्त्रिया सामान्यतः पांढऱ्या रंगाचीच साडी नेसतात. छातीवर पदर नसतो. मण्याचे व चांदीचे दागिने हौसेने भरपूर वापरतात. विशेषतः कलदार रुपयांच्या माळा आणि कंबरपट्टे हे या स्त्रियांचे आवडते दागीने होत. चेहऱ्यावर व अंगावरही गोंदण केलेले असते. कच्चे किंवा भाजलेले मांस अजूनही खाण्यात येते. परंतु अलीकडे मातीच्या मडक्यामध्ये किंवा ॲल्युमिनिअमच्या भांड्यामध्ये शिजवून खाण्याची सवय लागलेली असून भात किंवा तांदुळाचे आंबील –पेज– कोदो–कुसरी सारखे तृणधान्य आणि तांडी तसेच मोहाची फळे हे त्यांचे मुख्य खाद्य होय.

प्रामुख्याने मांसाहारी असलेल्या ह्या लोकांना कोणताही पशुपक्षी निषिद्ध नाही. सर्व प्राणी, सरपटणारे प्राणी, पक्षी, जंगली जनावरे हे लोक खात असले तरी माकड, घोरपड, हरीण हे प्राणी ह्यांना फार आवडतात. कावळा चिमणी, उंदीर, इतकेच नव्हे तर सर्प सुद्धा त्यांच्या भुकेतून सुटत नसल्या-मुळे ह्या भागात हे सर्व प्राणी फारच दुर्मिळतेने आढळतात. असे दिसून आलेले आहे की फक्त 'निळकंठ' पक्षालाच ते मारुन खात नाहीत आणि बहुधा ह्याचे कारण असे की, महादेवाशी–बडादेव–त्याचे साधर्म्य कल्पिलेले

---

2 Deogaonkar S. G. Madia of Inter India Publication, Bhamaragad, New Delhi, 1982

माडीयांच्या दैनंदिन जीवनात आपल्यासारख्या तथाकथीत आधुनिक समाजाला मागासले-पणाच्या द्योतक वाटणाऱ्या या गोष्टीशिवाय त्यांच्या सामाजिक जीवनात इतर अनेक वैशिष्टयपूर्ण संस्था, रुढी, धार्मिक कल्पना आढळतात. त्या सर्वांचा बारकाईने अभ्यास केल्यास माडियांची संस्कृती ही निरागस पण समृद्ध व त्यांच्या समूहजीवनाला उपकारक असल्याचे अभ्यासकाच्या लक्षात येते. त्यांची खेडी, त्यातील ग्रामसमुहाचे परस्परसंबंध शिकार, शेती इ. व्यवसायांचे स्वरूप, 'घोटूल,' इतकेच नव्हे तर धर्म व धार्मिक कथा ह्या सर्व गोष्टी त्यांच्या सांस्कृतिक समृद्धीची साक्ष देतात. एवढे मात्र खरे की सांस्कृतीकरणाच्या प्रक्रियेत ते फारच खालच्या स्तरावर आहेत असा निष्कर्ष केवळ त्यांच्या अत्यल्प अशा कपडयांच्या वापरावरून-अर्धनग्नतेवरून-काढणे इष्ट नाही. केवळ लंगोटी लावून फिरणाऱ्या अमेरिकन हिप्पींना आपण एका अत्याधुनिक संस्कृतीचे प्रतीक समजतो तर त्याच पोशाखामुळे माडिया किंवा तत्सम आदिवासींवर अतिमागासपणाचा शिक्का मारणे अयोग्य वाटते.

## त्यांच्या परिसरातील निसर्गाची वैशिष्ट्ये

सागवानाची दाट जंगले, उंच वाटणारी ताडी व गोर्गीची झाडे आणि मधून वाढणारी बांबूची वने व इतर लहान झुडपे ही त्यांच्या परिसरातील अरण्याची वैशिष्टचे होत जंगल असले तरी गवत मात्र दुर्मिळ असून पावसाळा बद झाला की दिसेनासे होते. फुलझाडे व फळझाडे अगदी कमी आहेत. आंब्यांची झाडे मात्र विपुल प्रमाणात आहेत. सरळ उंच वाढणाऱ्या अनेक वनराजी असलेल्या ह्या अरण्यात काटे मात्र अजिबात नाहीत म्हटले तरी चालेल. अनवाणी मुक्तपणे रानातून भटकण्यास प्रोत्साहन देणारीच ही एक बाब होय. जमीन, लालवट व रेताड स्वरुपाची असून फुसकुसीत आहे. केवळ पावसाळयातच भरून वाहणारे अनेक नाले आणि जुव्वी, बांदिया (बांडया) फर्लकोटा, इन्द्रावती व पामलगौतम् ह्या सारख्या प्रचंड मोठ्या नद्या हे ह्या परिसराचे आणखी एक वैशिष्टच होय. मधून टेकडया आणि त्या शेजारी लहान मोठ्या दऱ्या, एटापल्ली-भामरागड बिनागुंडा, सुरजागड ह्या परिसरात आढळतात. वाघ, सिंह, अस्वल ह्यासारखे प्राणी अपवादानेच आढळतात. रानमांजर, हरण, मोर तसेच घोरपड, मगर इ. सरपटणारे प्राणी, नीलकंठ, भारद्वाज व दोन शेपटयांचा लहान बुलबुल हे पक्षी ह्या भागात आढळतात. शांतता, रम्यता आणि भव्यता ह्यांचे सुरेख मिश्रण वातावरणात आढळते. ह्या सर्व नैसर्गिक वैशिष्टयांचा माडियांच्या दैनंदिन जीवनावर, स्वभावावर इतकेच नव्हे तर उच्चारण प्रक्रियेवर आणि संस्कृतीवर मोठ्या प्रमाणावर प्रभाव पडलेला आढळतो.

## माडियांची खेडी

जंगलात उंचसखल भागातून टेकडया, लहान दऱ्या ह्यांच्या काठाने माडियांची लहान लहान खेडी वसलेली असतात, सरासरीने २० ते ५० झोपडयांचे एक

खेडे असून रस्त्याच्या दुतर्फा वसविलेले असते. पूर्ण गावाच्या सभोवताली लाकडी फाटचांचे कुंपण असून गावाच्या आत मोठमोठाली आंगणे असलेल्या झोपडचा असतात. बांबू व मातीच्या भिंतीवर गवत किंवा शिंदीच्या पानांनी शाकारलेले, दोन किंवा तीन खोल्यांसारखे भाग पाडलेले घर असते. भिंती व आंगण उत्तम सारवलेले असते. जनावरे ठेवण्यासाठी लाकडी फाटे ठोकून चौकोनी आगा, आंगणाच्या आंत किंवा बाहेर केलेली असते. ताडीची किंवा गोर्गाची झाडे आणि काकडी, कडू दुधी व शेंगाचे वेल कुंपणावर व झोपडीवर चढवलेले असतात, प्रात विधीला हे लोक जंगलात बाहेर जातात. त्यामुळे गाव स्वच्छ असते. वाळलेल्या दुधी भोपळचापासून पाणी काढणे, पातळ पदार्थ वाढणे इत्यादीसाठी निरनिराळचा चमच्या सारख्या किंवा वाडग्यांसारख्या किंवा डावासारख्या गोष्टी तयार करतात. गाई–म्हशी, बैल, हेले ही जगावरे पाळतात पण ती केवळ शेतीच्या कामासाठीच असतात. दूध काढणे किंवा पिणे त्यांच्या परंपरागत कल्पनांनुसार निषिद्ध समजण्यात येते.

## पूर्वजांची स्मारके :–

गावातील महत्वाच्या जागी कभी जास्त आकाराचे फरशी सारखे दगड उभे रोवलेले (पुरुषांसाठी) किंवा आडवे ठेवलेले (स्त्रियांसाठी) आढळतात. ही त्यांच्या मृत पूर्वजांची स्मारके होत. ही पुरण्याची जागा नसते तर केवळ स्मारक असते. आणि त्यावर त्या पूर्वजास आवडणाऱ्या पक्षी किंवा जनावरांचे चित्र इ. लाकडात कोरून ठेवलेले असते. ह्याला 'कलबंडा' किंवा 'उरस्कल' म्हणतात. आणि पहिल्या श्राद्धदिनी किंवा तत्पूर्वी, विधीपूर्वक आणि रडत रडत ही स्मारके उभारण्यात येतात. मृतांना मात्र गावाबाहेर पुरण्यात येते. श्रीमंत व्यक्ति असल्यास जाळण्यातही येते. मृताला पुरतात त्या जागेवर दगडांचा चौकोनी ढीग किंवा चबुतरा करून त्यावर खाट, चादर, पाण्याचा माठ, कोंबडीचे पिलू इत्यादी गोष्टी मृताला शिदोरी म्हणून ठेवण्यात आलेल्या असतात. गावाच्या वेशीवर अनेकदा उंच बांबू लावून मारलेले माकड किंवा घोरपड उलटे टांगलेले आढळते. असे वेशीचे बंधन केले म्हणजे गावावरील अरिष्ट किंवा इडापिडा टळते असा समज आहे.

## समाजजीवन–काही सामाजिक संस्था

### आदि–समाजवाद :–

ह्या आदिवासी ग्रामीण समाजात अजूनही खरे साम्यवादी जीवन जगण्यात येते. इथे घरांना कुलपे लावलेली दिसणार नाही. चोऱ्या होत नाहीत. घेण्यापेक्षा देण्याची प्रवृत्ती आढळून येते. प्रस्तुत लेखिकेच्या अनुभवातून असे दिसून आले आहे की, एखादा लहानसा जरी प्राणी मारण्यात आला तरी त्याला एकटे

न खाता त्याचे लहान लहान तुकडे गावभर वाटण्यात येतात. इतकेच नव्हे तर गर्भवती स्त्रिला तिच्या उदरातील अर्भकाचा वाटा म्हणून ती वस्तू थोडी जास्त देण्यात येते. एखाद्या व्यक्तीवर अडचण किंवा आपत्ती आल्यास तो गावच्या मुख्यास आपली अडचण सांगतो किंवा पूर्ण गावावर एखादी आपत्ती आल्यास गावप्रमुख 'पोलो' जाहीर करतो, त्या दिवशी कोणीही शेतावर किंवा कामावर जात नाही. सर्व मिळून त्या अडलेल्या इसमाची किंवा गावाची कामे सहाकार्याने करून देतात, कोणत्याही नवीन कामास किंवा वस्तूच्या वापरास प्रारंभ करण्याचाही मुहुर्त असतो. ह्या मुहूर्त समारंभास 'पोलवा' म्हणतात. 'कोडी पोलवा' हा सर्वप्रथम येतो. त्यानंतर 'काकडीचा पोलवा' 'मक्याचा पोलवा' इत्यादी साजरे होतात पोलव्यासाठी सर्व स्त्री–पुरुष व मुले गावाबाहेर जंगलात किंवा नदीच्या पैलतीरावर जमतात. तेथे त्यांच्या कुलदैवताची (Clan–God) पूजा होते. सामान्यत: आडवे ठेवलेल्या बुंध्याच्या खांबाला पाने व फुले व रंगीत कपडा इ. बांधलेले असते. तोच असून त्याची पूजा आणि नैवेद्य झाल्यावर तो पदार्थ खाण्यास सुरवात होते. हा समारंभ, झाल्याशिवाय लहान मुलेसुद्धा तो पदार्थ खात नाही, एकंदरीत सामुहिक सहकार्याचे समाजवादी जीवन ते लोक जगत असतात.

**२. घोटुल : माडियांचे युवागृह**

'माडियांच्या संदर्भात बाह्य जगताला अत्यंत कुतुहलजनक ठरलेली त्यांची एक परंपरागत संस्था म्हणजे 'घोटूल' होय. गावाच्या मध्यभागी हे घोटूल असून त्याच्या समोर बरीच मोकळी जागा असते. घोटूल ही चौकोनी किंवा गोलाकार अशी एक झोपडी असते. तिचे एक किंवा दोन भाग पाडलेले असतात. तिच्या सभोवताली कुंपण असून त्याला दरवाजा असतो. आत अंगणात एक मोठा दगड ठेवलेली असून तो पाय धुण्यासाठी किंवा आंघोळीसाठी वापरतात. बस्तर विभागातील अभूज–माडियांचा अत्यंत बारकाईने अभ्यास करणाऱ्या 'डॉ. व्हेरिअर एल्विन' ह्यांनी ह्या घोटुलचे वर्णन ' Dormitories o: the Young ' असे केलेले आहे. पूर्वापार चालत आलेल्या पद्धतीनुसार वयात येत असलेल्या आणि आलेल्या तरुण–तरुणींची खेळण्याची मिसळण्याची आणि झोपण्याची ही जागा होय. व ह्यातूनच मुले–मुली आपापला जोडीदार निवडतात. विवाहित स्त्रियांना घोटूलमध्ये जाणे निर्बन्धित (Tabooed) करण्यात आलेले आहे. अलिकडे मात्र विशेषत: चंद्रपूर जिल्ह्यातील माडिया विभागात घोटूलच्या कार्यांचे स्वरुप बदलले आहे. उपलब्ध माहितीनुसार अनेक वर्षापूर्वीपासून घोटुलचे स्वरुप बस्तरमधील घोटूलपेक्षा भिन्न राहिलेले आहे. तरीपण सायंकाळी मुले-मुली इथे जमतात आणि नाचगाण्यात रमतात. मात्र आपआपल्या घरी जावून झोपतात केवळ मुलांसाठी आणि केवळ मुलींसाठी अशीही घोटुल असतात. ह्याची उदाहरणे भामरागड विभागात

कुवा कोडी आणि पुंगासूर येथे आहेत. अनेक घोटुलाच्या आत बारीक लाकडी कोरीव काम तसेच चित्रे चितारलेली दिसून येतात. अलीकडे ह्या घोटुलांचा उपयोग गावात आलेल्या पाहुण्यासाठी विश्राम–गृहासारखा केला जातो. इथे उतरलेला पाहुणा हा संपूर्ण गावाचा पाहूणा समण्यात येतो आणि त्याच्या जेवणासाठी गावातील सर्व लोक मिळून शिधा पाठवितात. किमान तीन दिवस त्याची अशी व्यवस्था होते.

अलीकडे मात्र विश्रामगृहाबरोबरच खेड्यातील विविध सामाजिक कार्यक्रमाचे केन्द्र (Community centre) असेही ह्याचे स्वरुप होत चाललेले आहे.

## ' घोटुल ' च्या कार्याचा सामाजिक व सांस्कृतिक संदर्भ :–

आनंद, मनोरंजन आणि शिळोप्याच्या गप्पा एवढाच घोटुलचा उद्देश नाही तर संपूर्ण समाज जीवनाची ओळख ह्या घोटुलमध्येच युवकांना करून देण्यात येते. एवढेच नव्हे तर, सामाजिक जाणिवा निर्माण करण्याचे प्रयत्न येथेच केले जातात. जगातील जवळ जवळ सर्वच आदिवासी जमातीत युवागृहे आढळतात. मुंडा, हो, उरांव, खरिया, भुईया (मध्यप्रदेश), नाग, मेमी, अंगामी, सेमा, छांग, कुकीज (आसाम) मुथुवन, मन्नन, पालियन (दक्षिण भारत) इत्यादी जमातीतही युवागृहे दिसतात.

### घोटुलचे स्वरुप

तरूण तरुणींसाठी वेगवेगळी स्वतंत्र व संमिश्र स्वरूपाची घोटुले आढळतात. वरवर जरी त्यांचे स्वरूप ऐच्छिक वाटत असले तरी प्रत्यक्षात मात्र ठराविक वयानंतर घोटुलचे सदस्यत्व अनिवार्य मानले जाते. ते क्वचित वस्तीच्या बाहेर जंगलात तर सामान्यत: वस्तीच्या मध्यभागी बांधलेले असते. झोपडीच्याच स्वरुपात असलेल्या घोटूलच्या मुख्य खांब व मयालींवर किंवा सारवलेल्या कुडांच्या भिंतीवर देवांची चिन्हे रेखाटलेली असतात. रंगरंगोटी केलेली असते. सभोवती सामान्यत: दुहेरी कुंपण असते. घोटुलचा साधेपणा नजरेत भरण्यासारखा असतो.

### स्वच्छंदी जीवन–

सर्वसाधारणपणे सायंकाळचे जेवण आटोपल्यानंतर तरुण तरुणी एकत्र जमतात, नाच, गाणी, गप्पा, नकला, थट्टामस्करी, इ. मौजमजेमध्ये सर्वजण मशगुल असतात

तरुण तरुणींच्या वागण्यात मोकळेपणा असतो. मुलांचे अंगमर्दन करणे, केस विंचरणे, इ. बाबी तरुणी उत्साहाने करताना दिसतात.

तरुणाचे मन जिंकण्यात यशस्वी झालेल्या तरुणीला फणी भेट दिली जाते. परिचयापासून सुरुवात होऊन प्रणयापर्यंत मजल तर जातेच पण मध्येच निसर्गाने आपले कार्य (गर्भवती राहिल्यास) साधले तर त्या तरुणाचे नाव त्या तरुणीला

सांगावे लागते. त्या तरुणाला मग त्या तरुणीशी विवाहबद्ध व्हावेच लागते तरीपण घोटुलमधील सर्वच बाबींबाबत गुप्तता राखली जाते.

यंत्रणा -घोटुल मधील सभासदांचे दोन भाग पाडले जातात.

१) वरिष्ठ

२) कनिष्ठ

सभासदांची कामे कनिष्ठ सभासदांना करावी लागतात. वरिष्ठामधून अधिकारी निवडले जातात. त्यांच्या पदाप्रमाणे त्यांना मान देण्यात येतो. ह्या अधिकारी वर्गांवरच सर्व कारभार सुसूत्रपणे चालविण्याची जबाबदारी असते.

अपुरी जागा, कुटुंबाच्या अंतर्गत व्यभिचार टाळण्यासाठी, जमातीचे संरक्षण होण्यासाठी आदिम जमातीत युवागृहांची स्थापना झाली आहे. मात्र माडिया जमातीत प्रचलित रुढी आहे की, पति–पत्नीनी घरात वैषयिक सुख घेणे योग्य नाही. पुरातन कालापासून चालत आलेल्या देवदेवता व पूर्वजांच्या प्रतिमा घरात असतात. त्यांच्या देखतच पति–पत्नीनी वैषयिक सुख घेणे अशिष्ट समजले जाते. शारिरीक मीलनासाठी जंगल हेच योग्य स्थान ते मानतात. ही रुढी मोडल्यास संबंध जमातीवर साथीचे रोग, दुष्काळ पडणे, कीटकांची धाड येणे अशी संकटं ओढवली जातात, अविवाहीत मुलामुलींना वैषयिक प्रशिक्षण देण्यासाठी घराचा वापर होऊ नये म्हणून घोटुलचा वापर होतो असे म्हणता येईल. (अर्थात माडियांच्या वयस्क लोकांकडून कळलेली ही माहिती पुरातन परंपरा दर्शविते. सध्या असे स्वरुप आढळत नाही.)

समाजातील परंपरा, प्रथा व चालीरिती ह्यांचे सातत्य टिकवून ठेवण्याचे कार्य घोटूलाद्वारेच झाले. स्वच्छंदी व आनंदी जीवन जगतानाच तरूण पिढीला तयार करून संस्कृतीचा वारसा जाणीवपूर्वक जतन करण्याचे महत्वाचे कार्य घोटुलचे सभासद करीत असतात. आपण एकाच जमातीचे आहोत ही भावना बळावते. ऐक्य अधिक बळकट होते.

तरूण तरूणींना एकत्र येण्याची संधी मिळाल्याने जीवनसाथी निवडणे शक्य होते. सहवासाने प्रेम निर्माण होते, एकमेकांच्या आवडी–निवडी स्वभाव व वृत्ती एकमेकांना परिचित होतात. तसेच स्त्री–पुरुष संबंधांचेही कथा–कथन, नृत्य गाणी, किंवा सवाल–जबाबातून शारीरिक मिलनाचे माहितीपूर्व शिक्षणच देण्यात येते. अपत्यसंभव न होता केवळ लैंगिक सुख मिळावे म्हणून माडिया गोंड यज्ञ व प्रार्थना करतात (संतती न होण्याच्या दृष्टिने सुरक्षित कालासंबंधीची त्यांना माहिती आहे.) एकूण काय घोटूलचे स्थान हे अद्वितीय आहे. सामाजिक जबाबदारीची जाणीव, जमातीचा अभिमान व शिस्तीचे संस्कार ह्या घोटूलच्या भूमिकेचे मूल्य कोणीही अमान्य करणार नाही. युवागृहाचे हे महत्व लक्षात घेऊन शासकीय

अधिकारी व समाज कार्यकर्ते घोटूलचा सामाजिक शिक्षणासाठी उपयोग करताना आढळून येतात.

नवीन पिढीला उद्बोधक माहितीं देण्यासाठी घोटुलचा वापर करतात. इतकेच नव्हे तर सामुदायिक रेडियो सेटसुद्धा घोटुलमध्ये ठेवण्यात येतात.

## ३. विवाह पद्धती आणि गोत्र विचार.

विवाह संस्थेचा जन्म, वैयक्तिक व सामाजिक गरजेतून झाला आहे. व्यक्तीला शारिरीक व मानसिक स्वास्थ्य, रतिसुख आणि समाजात वंशसातत्य व अखंडीत समाजजीवन हवे असते. हे महत्वपूर्ण कार्य विवाह संस्था करते. आदिम समाजातही विवाहसंस्थेचे अस्तित्व असून विवाहविषयक नियमांचे पालन अत्यंत कांटेकोरपणे केले जाते.

आदिम समाजात विवाहाचा प्रमुख हेतू सामाजिक ऐक्य निर्माण करणे हा होता. विवाहामुळे वधू व वर ह्यांच्यातच केवळ दृढ संबंध निर्माण होतात असे नाही. तर या दोघांची घराणी, गाव व कुळ कायमची स्नेहरज्जूंनी बाधली जातात.

सर्व साधारणपणे आदिवासी जमातीत बालविवाहांची प्रथा आढळून येत नाही. विवाहबाह्य संबंधाबाबत आदिवासी हा अतिशय कडक भूमिका घेणारा आहे. विवाहापूर्वीच्या संबंधाबाबत मात्र ते तेवढे काटेकोर नाहीत.

तसेच आदिम जमातीत पतीपत्नींना परस्परांपासून घटस्फोट घेण्याचा अधिकार आहे. घटस्फोटाची विविध कारणे दाखविता येतील. दीर्घकालीन आजार, आळशीपणा, न जुळणारा स्वभाव, व्यभिचार इ. अनेक कारणे असू शकतात'

माडियामध्ये सगोत्राचे लग्न होत नाही. मामाची मुलगी व बहिणीची मुलगी भावाच्या मुलाला आणतात. त्याला 'गुडीपिल्ला' किंवा 'पिटूनपिल्ला. म्हणतात. मामाची किंवा आत्याची एकतरी मुलगी त्या घराण्यात देतातच.

## विवाहाचे प्रकार

१) जबरदस्तीने धरुन नेऊन लग्न करणे.
२) तरुण मुलगा व मुलगी हे दोघेही दुसऱ्या जागी पळून जाऊन विवाहबद्ध होणे.
३) घरजावई म्हणून लग्न करणे.
४) समाजाच्या रुढी प्रमाणे रीतसर मागणी घालून विवाहबद्ध होणे.
५) विधवा–विवाह.
६) स्त्री विधवा असल्यास तिच्या घरी जाऊन राहणे व विवाह करणे.
७) एखादी मुलगी स्वत:हून एखाद्या मुलाच्या घरात शिरते व राहायला लागते व मग त्यांचे लग्न होते.

अशा विविध प्रकाराने लग्न होते.

४) गोत्रपध्दती व कुलदैवत –

कुल व कुलप्रतीकाविषयी आदिम जमातीत अपार श्रद्धा आढळून येते. कुलप्रतीके ही मानवेतर प्राण्यांची असतात. कुलप्रतिकाद्वारे जमातीतील सदस्यांची नाती गोती व कुलद्वये स्पष्ट होतात.

माडियांची 'जंगोदेवी' ही बहीण व 'लिंगो' हा भाऊ ह्या दोघात बाराकोट देवांच्या वाटण्या झाल्या. देवानेच शाखा गोत्र व लग्नसंबंध निश्चित केले व त्या नियमांचे पालन करण्यास त्या लोकांना सांगितले.

**कुलदैवतांची नावे**

**१) चार देववाल्यांच्या देवांची नावे–**

(अ) १) श्रीमाल २) श्रीपाल ३) श्रीकाल ४) श्रीलाल

| | |
|---|---|
| (ब) शाखा – | नालवेन |
| (क) वंश – | देवाळीर |
| (ड) गोत्रज – | हिडागो, सेडमाकी, मंगास, कवडा, नैताम, कुसराम, हेमलाक्, पूसाम, परचाकी, |
| (इ) कुलदैवत – | मिनाडोल कासव |

**२) पाच देववाल्यांच्या देवांची नांवे–**

१. अहेराहुड २. महेराहूड ३. रेकाराहूड ४. श्रीमालराहुड ५. दोंदल्याल राहुड,

| | |
|---|---|
| (ब) शाखा | सैवेन सगा |
| (क) वंश | राहुड वंश |
| (ड) कुलप्रतिक | पोनोळ (रामलक्ष्मण पक्षी) |
| (इ) गोत्रज | भाऊबंद<br>गावडे, आडे, कुमरे, सुरपाम, किनाका, अन्हाक, बुराम, धीकराम, कुसरागी, अलागी, हिचामी, लेकामी, कांदो, अरका, पोयाम इ. |

**३) सहा देववाल्यांच्या देवांची नावे–**

(अ) १. अहेउदाल, २. महेउदाल, ३. अपाईउदाल, ४. तिपाईउदाल ५. भंडकुसुर उदाल, ६) कोईदूउदाल,

| | |
|---|---|
| (ब) शाखा – | पांडवेन सगा सारवेन |
| (क) वंश – | ओदालीर वंश |
| (ड) कुलप्रतीक – | पुली – वाघ |
| (इ) गोत्रज – | आत्राम, गेडाम, तोडसाम, पेंदोर, कोराम, कुळमेथे, कोडापे, उईके, येरमे, कोटनाक, पुंगाटी, कंगाळी, जुकनाल, नागोटी इ. |

४) सात देववाल्यांच्या देवांची नावे.

अ) १. धनवाई, २. धनाठाकूर, ३. पिडचे जुंगा, ४. रायमुदा, ५. चिकटराज, ६. भंडेसारा, ७. भुईगोटा.

| | |
|---|---|
| (ब) शाखा – | येळवेन |
| (क) वंश – | पेनपिडीयोर |
| (ड) कुलप्रतीक – | सुईपिट्टे सारस |
| (इ) गोत्रज – | मडावी, मेसराम, पंदराम, धुरवा, सयाम, पुसनाक, मरसकोला, मराटे, हेडो, बागामी, वाडवे इ. |

५) जंगवेन-येरवन शाखेची [illegible] वे.

१. रेवे जूंगाल, २. रेवे मांगाल, ३. रेवे सुकाल, ४) इंदाळी जगाल ५. इंदाळी लिंगाल, ६. तडकी साराल, ७. तडकी माराल. ८. इसूम धाडमुल्लाल.

कुलप्रतीक – रायचिडीमाटो (पोपट)

६) बारा देवतारे देवांची न वे (जंगवने शाखा)

(अ) १. तडकी साराल, २. तडकी माराल, ३) रेवे जुंगाल, ४. रेवे सुकाल, ५. ताटमुडी ताटराल, ६. इसूम धाडमुल्लाल.

वरील सहादेव मिळून तोरे ह्यांचे बारा देव गणले जातात.

| | |
|---|---|
| (ब) वंश | जगालीर |
| (क) कुलप्रतीक | हर्रे (बोकड) |
| (ड) शाखा | जंगवेन |
| (इ) गोत्रज | तूमराम, हरे कोडापा, सलाम, मंडाली, चेदी, रायचिडाम, इ. |

## ३) विवाह विधी

अती मागासलेला असा हा समाज असूनही मुलींचे विवाह बालवयात होत नसून वयात आल्यावरच होतात. साधारण चौदा वर्षानंतर अठरा ते वीस वर्ष वयापर्यंत मुलींचे विवाह होतात. विवाहापूर्वी मुलामुलींना मिसळण्याची संपूर्ण मोकळीक असल्याने ते स्वतःच स्वतःच्या जोडीदाराची निवड करतात. पण आईवडिलांच्या संमतीने देखील विवाह ठरतात. लग्न मुलाच्या घरी लागते व मुलीकडचे वरात घेऊन येतात. भोवतालच्या गावातील लोक पायी किंवा बैलगाडीने येतात. लता पल्लवांनी शाकारलेला मांडव असून ओल्या बांबूचे तुरे, मोरपिसे आणि आंब्याची तोरणे ह्यांनी शृंगारलेला असतो. विवाहासाठी मांडवाच्या मध्यभागी एका मोठ्या सालईच्या झाडाच्या खोडात कोरलेला खांब लावलेला असतो. शेणाने

सारवलेले बोहले पण असते. ह्या खांबालाच लाकडी देव बांधलेला असतो. इथेच विवाहाचे धार्मिक विधी होतात. ह्यात स्त्रियांचे नृत्य व गाणी ह्याला फार महत्व असते. तरुण मुलीपासून तो जख्ख म्हाताऱ्यांपर्यंत सर्व स्त्रिया मुक्त मनाने नृत्य करतात व गाणी म्हणतात. दोन–दोन–तीन–तीन वर्तुळे नाचत असतात. दोन्ही बाजूच्या विहीण एकमेकींच्या उखाळ्या पाखाळ्या काढत असतात. त्यातून हास्याची कारंजी उडतात. कोणीच काही मनाला लावून घेत नाहीत, पुरुष मंडळी मोहाची दारु पीत असतात. ह्या दारुसाठी मात्र आठ गुंड, दहा गुंड, बारा गुंड अशी गुंडाने दारु पाजण्याचा करार झालेला असतो. मुलीकडच्यांना मुलाकडून मेजवानी असते. समोरच्या रिकाम्या आंगणात तीन किंवा चार झाडे तोडून मोठ्या होळीसारखी लाकडे पेटवितात व तिच्या भोवती संपूर्ण रात्रभर मोहाची दारु पिऊन सर्व स्त्री–पुरुष ढोलकी नृत्य करीत असतात हे नृत्य फारच लयबद्ध असते. माडियामध्येही सगोत्री विवाह होत नाही. पहाटेच्या सुमाराला वधुवरास पुन्हा मांडवात नेतात आणि बोहल्यापाशी उभे करून मांडवावर चढून घागरीने पाणी ओततात. सर्व वडील माणसे पाणी ओततात व शेवटी मुलाचे आईवडील पाणी ओततात. नंतर कपडे बदलण्यात येतात. त्यानंतर त्या मुलीला पुन्हा पोलके घालता येत नाही. ह्या विभागात दोन पासून चार पावेतो बायका करतात.

## स्त्रियांचे स्थान

माडिया कुटुंबात स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीने स्थान आहे. कुटुंबातील प्रत्येक स्त्री शेतीवर व जंगलात कामे करून कुटुंबाला हातभार लावते व घरातील सर्व कामे करते. बैलाच्या बरोबर नांगर ओढण्यापासून तो मोठ्या सब्बलीने जमीन खणण्यापावेतो सर्व कामे स्त्रिया करतात. त्यामुळे कुटुंबाला पुरुषापेक्षाही स्त्रियाच जास्त हातभार लावतात. इतके असूनही त्या सतत उत्साही आणि आनंदी असतात. त्यामुळे एका पेक्षा जास्त विवाह करणे ही पुरुषाला आर्थिक दृष्टया जमेचीच बाजू होते. ह्या पद्धतीमध्ये मुलीकडच्यांना मुलाकडचे हुंडा देतात.

## सामाजिक नेतृत्व :

ह्या जमातीत स्थानिक नेत्यांमध्ये पाटील (पटेल), गायता, धार्मिक कार्य करणारे पेरमा किंवा पुजारी ह्यांना फार महत्व असते. त्यांचाच सर्व गावावर वचक असतो. कोणतीही नवीन गोष्ट करायची असल्यास त्यांचा प्रथम सल्ला घेण्यात येतो. रोगराई किंवा कोणतीही आपत्ती आल्यास लोक प्रथम त्यांच्याच-कडे जातात. विकास योजना सुरु झाल्यानंतरसुद्धा गायता किंवा पटेल ह्यांचे महत्व कायम आहे. किंबहुना त्यांच्यापैकी लोक पंचायत समितीत किंवा सरपंच म्हणून निवडून येतात. देवाचा कौल किंवा जादूटोणा यावर त्यांचा फार विश्वास

आहे. हें लहान, स्थानिक नेतृत्व सोडल्यास, माडिया–गोंडाचे राजे असलेले अहेरीच्या जमीनदारीचे राजे हे त्यांचे प्रमुख नेते होत. त्या घराण्यातील राजे श्री. विश्वेश्वरराव महाराज हे आज त्यांचे राजे समजण्यात येतात. महाराज राजगोंड असून माडिया गोंड व इतर गोंड हे त्यांना परंपरागत राजे म्हणून कुलदेवतेसमान मानतात. कुटुंबात नवीन अपत्य जन्माला आल्यावर महाराजांच्या पायावर आणून घालणे, शिकवावे किंवा नाही याबाबत त्यांचे मत घेणे, त्यांना नमस्कार करताना त्यांच्या पायाचे चुंबन घेणे ह्या गोष्टी आजही चालू आहेत. 'दसरा' हा त्यांचा फार मोठा सण असून दसऱ्याच्या दिवशी माडिया 'स्त्री–पुरुष' फार मोठ्या संख्येने अहेरी जमीनदाराच्या महाराजांच्या वाड्यासमोर जमतात. त्यांच्यासाठी भेटी आणतात. जमवून ठेवलेले जुने चांदीचे रुपये त्यांना नेऊन वाहतात. त्यांची पालखी वाजत गाजत अहेरी गावाच्या सीमेवरील दसरा मैदानापर्यंत मिरवीत नेतात. महाराजांच्या ह्या प्रभावामुळे बाह्य जगातील राजकीय किंवा धार्मिक प्रभावापासून माडिया लोक बरेच दूर राहिलेले आहेत. या दहा ते पंधरा वर्षातील नवोदित तरुण पिढीत मात्र परंपरागत नेतृत्वाबद्दल एवढी निष्ठा दिसून येत नाही.

## कुटुंबसंस्था :

मानवसमाजाच्या विकास टप्प्यातील कुटुंब ही पहिली अवस्था होय. मानवी विकासाच्या सर्व अवस्थात कुटुंब ही संस्था अस्तित्वात होती असे दिसून येते.

**The Family is the Social Unit based on marriage. It includes the parents and children.–**

**– Robert Lowie**

व्यक्ती व समाजाचे हित लक्षात घेऊन कुटुंब अनेक प्रकारच्या महत्वपूर्ण भूमिका बजावित असते.

व्यक्तीची कामवासना हो शारीरिक सहज प्रवृत्ती आहे. कामवासनेची तृप्ती आणि त्या तृप्तीचे फळ-प्रजोत्पत्ती. त्यांचे पालनपोषण व संवर्धन अशा दुहेरी दृष्टीने कुटुंब संस्थेचे महत्व आहे.

व्यक्तीचे खऱ्याखुऱ्या अर्थाने मानवीकरण कुटुंबातच घडते. नव्या पिढीला कुटुंबातूनच समाजाच्या विविध अंगाची ओळख पटत असते.

कुटुंबप्रमुखाबद्दल आदर व प्रेम वाटत असल्याने त्याचे नियंत्रण मानले जाते. त्याचप्रमाणे वृद्धांची काळजीही घेतली जाते. कुलदैवतांची पूजा व इतर कुलांच्या चालीरितींचे व परंपरांचे पालन कुटुंबाद्वारेच होते.

आदिवासींमध्ये मातृसत्ताक व पितृसत्ताक कुटुंबपद्धती आढळतात. माडियांमध्ये मात्र पितृसत्ताक कुटुंब पद्धतीच आढळते.

घटस्फोट सहजतेने मिळत असल्याने सार्वत्रिक दिसतो. स्त्री–पुरुषांच्या श्रमाचे विभाजन झालेले असल्याने विलनीकरण सुलभ आहे. तरी पण वैयक्तिक विचार आणि मुलांचे संगोपन यासाठी आर्थिक कारणावरच माडिया कुटुंब टिकून आहे. पण आई–वडिल, वयात आलेली मुले व मुली ह्यांच्या एकत्रित राहण्याने परस्पर सामंजस्य आणि समाधान, ह्या कुटुंबात दिसून येते.

## धार्मिक संस्था :

निसर्गात अनपेक्षित, अनाकलनीय व संहारक आणि मानवी जीवनातही अकल्पित घडणाऱ्या घटना पाहून 'कर्ता–करविता' वेगळाच आहे अशी भावना दृढमूल झाली व त्या दिव्य शक्तीविषयी गाढ श्रद्धा साकारित झाली. यातूनच 'धर्म' ह्या संकल्पनेचा उदय झाला.

आदिमांचा अलौकिक शक्तीवरील विश्वास रतिभरही कमी झालेला नाही. आदिम समाजात धर्माला अनन्यसाधारण महत्व दिले जाते. रानावनात संचार करणारे व डोंगरदऱ्यात राहणारे आदिवासी निसर्ग सानिध्यातच वावरत असतात. साहजिकच निसर्गाच्या अलौकिक रौद्र स्वरुपाने अवाक् होतात. धान्य पिकविणारा निसर्ग हा मित्र आहे. तसाच शत्रू देखील आहे म्हणून कोणत्याही क्रियेची सुरु. वात करताना प्रथमतः त्या विराट शक्तीपुढे ते लीन होतात. म्हणूनच ज्यांचे सामाजिक, आर्थिक, सांस्कृतिक व इतर व्यवहार धर्मतत्वानी अनुरूप असतात. आधिभौतिक विश्वातील सर्वांत पवित्र व चांगला भाग म्हणजे धर्म असे ते मानतात.

अलौकिक शक्ती असंतुष्ट होईल असे कोणतेही वर्तन त्यांना मान्य नाही. ही शक्ती असंतुष्ट झाली तर सर्व समाजाचा नाश ओढवेल ही त्यांची श्रद्धा असते. म्हणून त्यांच्या समाजजीवनाचा अभ्यास धर्मश्रद्धा बरोबर घेऊनच करावा लागतो. अलौकिक शक्ती वरील विश्वास आणि त्या शक्तीला संतुष्ट करण्यासाठी केले जाणारे कर्मकाण्ड हे धर्माचे दोन प्रमुख घटक आहेत. म्हणूनच आदिमांच्या धर्मश्रद्धेत बहुदेववाद, एकदेववाद जादू–टोणा, मंत्र–तंत्र, प्रेतात्मा व भुत–पिशाश्च हे प्रकार सामावलेले दिसतात.

आत्मा अमर आहे व शरिर सोडून गेल्यानंतरही तो भूत (देव) व पिशाच्च अशा अलौकिक स्वरुपात वावरु शकतो ही आदिमांची प्रगाढ श्रद्धा आहे. माडिया लोक 'बडा देव' मानतात.

पशुपक्षी, प्राणी, वनस्पती ह्यांच्या जिवंतपणाचे कारण आत्मा आहे. म्हणूनच पशुपूजा, वृक्षपूजा, पक्षीपूजा व जलदेवतेची पूजा त्यांच्यामध्ये आढळते.

ह्या दैवी शक्तीला प्रसन्न करण्याचे निरनिराळे प्रकार आदिवासीमध्ये प्रचलित आहेत. देवतेची प्रार्थना करणे, कोंबडा–बकरा बळी देणे इतकेच नव्हे

तर नरबळी देणे ह्या सुद्धा प्रथा प्रचलित आहेत. ज्या पशूचा बळी दिला जातो त्याचे मांस व रक्त प्रसाद म्हणून वाटले जाते.

तसेच अलौकिक शक्तीला प्रसन्न करण्यासाठी करावयाच्या नियमांचे पालन आदिवासी काटेकोरपणे करताना आढळतात. व्यक्तीच्या जन्मापासून तो मृत्यू-पावेतो धार्मिक–विधींची मालिकाच आढळते.

धार्मिक समारंभात देवदेवतांचे पावित्र्य टिकविण्यासाठी अपवित्र बाबींचा स्पर्श टाळला जातो. उदा. सुतक असलेल्या लोकांचा स्पर्श टाळतात. कुलप्रतीक असलेल्या प्राण्याची व पक्षाची हत्या करीत नाहीत. धार्मिक विधी केल्यानेच देवतेची कृपा संपादन करता येते अशी त्यांची दृढ समजूत आहे.

## जादूवरील श्रद्धा :

त्यांच्या कर्म कांडात इतर अनेक विधीप्रमाणे अलौकिक शक्तीला अनुकूल करून घेण्याचे महत्वाचे साधन म्हणजे 'जादू' असे ते मानतात. दिव्य शक्तीवर प्रभुत्व मिळविण्यासाठीही जादूचा वापर केला जातो. जादुचे प्रकार दोन–

**१) पवित्र व चांगली जादू**

**२) काळी जादू (जादूटोणा)**

गुप्त मंत्र, भौतिक पदार्थ, विशिष्ट उच्चार व कृती यांचा मेळ घालून विशिष्ट हेतूसाठी जादूचा वापर केला जातो. सर्व जमातीच्या कल्याणासाठी तसेच एखाद्या व्यक्तीला त्रास देण्यासाठी किंवा बाधा करण्यासाठी अशा दोन्हीही कारणानी जादूचा उपयोग करण्यात येतो.

शरीराचा कोणताही भाग वा वापरात आलेल्या वस्तूवर जादू–टोणा केल्यास संपूर्ण शरीराला त्रास होतो म्हणून आदिवासी आपले कपडे, केस, नखे इ. काळजी-पूर्वक लपवून ठेवतात.

जादूविद्येचा केन्द्रबिंदू म्हणजे मंत्र होत. योग्य शब्द, लयबद्ध रचना व प्रास-प्राचुर्य ह्यावर मंत्राची उभारणी आहे व त्यातच त्यांची अलौकिक शक्ती आहे. जादूतील मंत्रांचे शब्द, क्रिया व त्यांचे उच्चारण ह्याबाबत गुप्तता राखली जाते.

माडिया जमातीतील मांत्रिक खेड्यावर आपत्ती येऊ नये म्हणून मंत्र उच्चारण करुन वेशीवर प्राणी मारून लटकवून ठेवतात किंवा खिळे ठोकतात.

जादूच्या परिणामाविषयी आदिवासी कधीही शंका व्यक्त करीत नाहीत. कारण त्यांची जादूवर प्रगाढ श्रद्धा असते.

## 'सर्वज्ञानी' भगत किंवा पेरमा

ह्या धार्मिक विधीचे ज्ञान असणारे व जादू विद्येत पारगत असणारे व्यावसायिक लोक प्रत्येक आदिम समाजात आढळतात. जादुविद्येत पारंगत

असल्याने अलौकिक शक्तींवर ताबा मिळविणाऱ्या अधिकारी व्यक्तीला सर्व सामान्यपणे 'भगत' म्हणण्यात येते.

मध्यप्रदेशात त्याला 'बैगा, गुणिया व पंडा' म्हणतात. कमार जमातीत 'झाकर' म्हणतात. मध्यप्रदेशातील गोंड त्याला 'भूमियां' म्हणतात. माडिया मात्र त्याला 'पेरमा' म्हणतात. त्याला सर्व तऱ्हेचे मंत्र येतात. उदा. मोहिनी मंत्र, रोगनिवारक मंत्र, हवापाण्यावर ताबा मिळविण्याचे मंत्र, पिके उत्तम येण्याचे मंत्र, हिंस्त्र जनावरांचा बंदोबस्त करण्याचे मंत्र इ. ह्या मांत्रिकावर अनेक प्रकारची बंधने असतात. त्याने रजस्वला स्त्रीचा शब्द ऐकता कामा नये. पडवळाची भाजी खाता कामा नये ब्रह्मचर्य व्रत पालन व आचरण शुद्ध असावे. तो इतराशी संबंध ठेवीत नाही. अगदी थोडे अन्न खातो. आदिवासींच्या दृष्टीने तो पेरमा म्हणजे साधु संतच होय. पेरमाचे समाजातील स्थान अनन्यसाधारण आहे. अर्थात त्यासाठी त्याला समाजविधायक कार्ये करावी लागतात.

## १) रोगनिवारणाचे कार्य.

पेरमा किंवा पुजारी हा त्यांचा डॉक्टरच असतो रोगाचे कारण म्हणजे चेटूक, देवतांची अवकृपा किंवा पूर्वजांचा कोप अशी त्यांची पक्की समजूत आहे. पेरमा त्या रोगाचे कारण शोधून काढून मग देवतेला संतुष्ट करून पूर्वजांचा कोप घालवून मंतरलेला ताईत वा गंडा देतो.

गर्भपात करणे, अडलेल्या बाळंतीणीची सुटका करणे, गर्भाशय निरोगी करून देणे इत्यादी साठीही ह्या पेरम्याचा उपयोग करण्यात येतो. त्याच प्रमाणे झाडपाल्याची औषधे देण्याचेही कार्य हे पेरमा अगर पुजारी करतात. व काही वेळा त्याचा अत्यंत उत्तम असा गुण येतो.

सध्या मात्र ही परिस्थिती बदलत आहे. माडिया हा औषध घ्यावयाला लागला आहे. पदमश्री डॉ. बाबासाहेब आमटे ह्यांचे चिरंजीव डॉ. प्रकाश आमटे व सूनबाई डॉ. सौ. आमटे ह्यांच्या प्रयत्नाने औषध घेण्यासाठी हे लोक तयार होत आहेत.

## २) प्रिय व्यक्ती वश करणे.

स्त्रीपुरुष संबंधाकडे आदिवासी निकोप मनाने पाहतात. प्रिय व्यक्तीच्या मिलनासाठी व प्राप्तीसाठी ते उत्सुक असतात. हे काम देखील पेरम्याला करावे लागते.

## ३) दैवी इच्छेचा अंदाज घेणे. (कौल लावणे)

एखादी नवीन गोष्ट करावयाची असल्यास ती करावी किंवा नाही ह्यासाठी देवाला कौल लावण्याचे कार्यही पेरम्याला करावे लागते.

## ४) हवापाण्यावरील नियंत्रणाचे कार्य

आदिवासींना विस्मयचकित करून सोडणाऱ्या नैसर्गिक शक्ती उदा. गारांचा पाऊस, वीज पडणे, धरणीकंप होणे इत्यादी काबूत ठेवण्याचे महत्त्वाचे कार्य फक्त पेरम्यालाच येऊ शकते असा त्यांचा अपार विश्वास आहे. पेरम्याला अशा प्रकारचे अनन्यसाधारण स्थान आदिम समाजात आहे. दैवी सिद्धी प्राप्त झालेला व मांत्रिक बळ लाभलेला एक अद्वितीय "अवलिया" म्हणून त्याला बहुमान मिळतो. वरील पैकी कोणत्याही कार्याचे तो कधीही पैसे किंवा मानधन स्वीकारीत नाही. फक्त सणावाराला त्यांच्याकडे शिधा पोहोचविण्यात येतो.

## देवदेवता :

'बडा देव–फेरसापेन–हा माडियांचा मुख्य देव होय.

जंगो आणि लिंगो ह्या बहीणभावांनी बंदिवासातील देवांना मुक्त केले व 'बाराकोट' देवांची वाटणी केली. ती खालीलप्रमाणे :–

१) पारेंड, पारऊंडी, पार, नैं.

२) उंदोर, चिंदोर, कांदोर, नालवेन,

३) सैवेन, सारवेन, येळवेन, जंगवेन.

ह्यापैकी उंदोर, चिंदोर व कांदोर हे लहान शाखेचे समजले जातात. नालवेन, सैवेन, सारवेन व येळवेन हे मोठ्या शाखेचे समजले जातात.

## तीर्थयात्रा :

१) कोटापरंदुली येथे पौष शुद्ध प्रतिपदेपासून वैशाख वद्य ३० पर्यंत जंगो-देवीची यात्रा करावी व 'सुग्रास पडा' म्हणजे चांगल्या गाईचा यज्ञ करावा असे त्यांच्या धर्मकथांमध्ये सांगितले आहे.

२) शेषाची कैसलापूर येथे पौष शुद्ध प्रतिपदेपासून पौष वद्य ३० पावेतो यात्रा करावी असे सांगितले आहे.

३) बरवाकोट येथे पांहडी कुपार लिंगोची वारी वैशाख शुद्ध प्रतिपदेपासून वैशाख वद्य ३० पर्यंत व 'भोंडुंग सांडाचा सुजारा' म्हणजे यज्ञ करावा असे सांगितले आहे.

४) कुंवारा भीवसेनाचे एक स्थान रामटेक जवळ आहे. त्याची यात्रा चैत्र महिन्यात असते. त्याप्रमाणे 'भीवसेन'–भीमसेन देवाची पूजा केल्याशिवाय नवीन दारू–मोहाची–पीत नाहीत. प्रथम भीवसेन देवाला मोहाची दारू अर्पण करतात. नंतर नवऱ्याच्या कपाळाला, खांद्याला व गुडघ्याना बायको दारूची बोटे लावते व तसेच बायकोलाही नवरा दारुची बोटे लावतो. त्याला 'दारु ओवाळणे' म्हणतात. त्यानंतर दारु घेण्याचा समारंभ साजरा करतात.

आणखी काही देवांची नावे पुढील प्रमाणे :-

१) चिकातराज  ३२) भानागरा  ३) इदमारी
४) उरामारद  ५) भूमीसिराड्  ६) घुंटेदेव
७) बादलदेव.

काही सणांची नावे :-

१) दसरा  २) दिवाळी  ३) होळी.
४) धिनु पेंडुम-पावसाचा सण (५) कोडी पेंडुम– अंकुरांचा सण
७) विज्जा पेंडुम – बियांचा सण. (७) कुरुम पेंडुम – नवीन धान्य खाण्याचा सण.

महिन्यांची नावे :

| | | | |
|---|---|---|---|
| १. कुमुरी | २. सुकला | ३. नोवा | ४. पोरा – पोळा |
| ५. दसरा | ६. दिवारी (दिवाळी) | ७. पानडी | ८. पुसी (पौष) |
| ९ माई | १०. डोयारी | ११. सेयती | १२. बासन (वसंत) |

## आर्थिक संस्था

### शेती आणि इतर व्यवसाय

माडिया प्रामुख्याने शिकार आणि शेती ह्यावर आपला उदरनिर्वाह चालवितात. त्याप्रमाणे जंगलात सापडणाऱ्या फळे, फुले व पाने आणि अन्य वस्तू वेचणे हा ही एक दुय्यम व्यवसाय म्हणावयास हरकत नाही. खेड्याच्या जवळपास जंगलात मजुरीसाठी देखील जातात. शेतीसंबंधी माडियांचे एक वैशिष्टय म्हणजे "फिरती शेती" हे होय. अतिमागास आदिवासींमध्ये फिरती शेती (Shifting Cultivation) रुढ आहे. बैगा ह्या जमातीमध्ये ही पद्धती असण्याचे कारण त्यांची भुमातेबद्दलची अढळ श्रद्धा हे आहे. मातेसमान असणाऱ्या जमीनीवर नांगर फिरविल्याने त्यांच्यावर परमेश्वराचा कोप झाला म्हणून त्यांनी नांगरणे बंद केले. माडियांमध्ये ही फिरती शेती परंपरागत चालत असल्याचे दिसून येते. मात्र ही शेती अहेरी जमीनदारीच्याच भागात चालत असे. हिला ते 'पेंदा' म्हणतात. ह्या पद्धतीमध्ये एखाद्या खेड्यातील जमात जंगलातील काही भाग निवडते व तेथील झाडे कापून ती कापलेली झाडे जाळण्यात येतात व त्यांची राख होते. ह्या राखेवर पुरेसा पाऊस पडल्यानंतर बियां हवेतून फेकण्यात येतात. आणि हे पीक उगवल्यावर कापण्यात येते. दोन वर्षे एका ठिकाणी पीक घेतल्यावर तिसऱ्या वर्षी हे गाव जवळच्या दुसऱ्या विभागात जाते आणि पुन्हा अशाच प्रकारे शेती करण्यात येते. साधारण पंधरा वर्षानंतर पुन्हा पहिल्या ठिकाणी ते खेडे परत येते. ह्यात अरण्यातील झाडांचा वाटेल तसा विनाश होतो. महाराष्ट्र शासनाने ह्या विभागातील फिरती शेती करणाऱ्या कुटुंबांना आर्थिक मदत व

सहाय्य देऊन एका जागी वसविण्याचे प्रयत्न केले. हे सर्व लोक माडिया असून एकूण दहा गावे वसविण्यात आली. एकूण १४६ माडिया कुटुंबांना स्थिर करण्यात आले. जंगलात मोठ्या प्रमाणावर उपलब्ध असलेला बांबू व भारतात उत्तम प्रतीचे समजण्यात येणारे सागवान ही ह्या जंगलाची वैशिष्टये आहेत. बांबूपासून टोपऱ्या दूरड्या, लहान मुलांची खेळणी आणि लाकडाचे कोरीव काम इत्यादी कला माडियांना उत्तम अवगत आहे. ह्या सर्व कलागुणांचा ते फक्त स्वतःच्या उपयोगासाठीच वापर करतात. उद्योग म्हणून ते कुठलिही कला राबवित नाहीत.

ह्या भागात अगदी आता पावेतो 'मीठ' ही अत्यंत दुर्मिळ वस्तू होती. झाडावरील लाल मुंगळे वाळवून ते आवडीने खात व त्यातील खारटपणावर समाधान मानीत. भामरागड विभागात एक पोते मिठासाठी एक पोते धान तर दक्षिणेकडील विभागात मिठाबरोबरच्या वजनाची चारोळी हे लोक देत असत. आगपेटी आणि मातीचे तेल ह्या देखील त्यांना दुष्प्राप्य वस्तू होत्या पण प्रत्येक माडियाच्या घरी अखंड 'अग्निहोत्र' असल्याने या दोन्ही वस्तुंची फारशी गरज भासत नाही.

## माडिया जमातीचा सांस्कृतिक व सामाजिक विकास :

वरील संक्षिप्त विवेचनावरून हे लक्षात येते की, शहरी संस्कृतिशी त्यांचा संपर्क अजून आलेला नसला तरी त्यांचे सामाजिक जीवन आणि परस्पर संबंध हे त्यांच्या सुसंस्कृतीचेच द्योतक आहेत. केवळ लंगोटी लावून राहतात म्हणून त्यांना असंस्कृत का म्हणावे ? अति प्रगत अशा अमेरिकन संस्कृतीतील हिप्पी हे जहे 'लंगोटी लावणे' हे अतीप्रगतीचे प्रतीक समजतात आणि सर्व प्राण्यांचे मांस मोठ्या हॉटेलातून खातात तर नेमक्या ह्याच दोन निकषांवर माडियाना अप्रगत किंवा असंस्कृत म्हणजे उचित होणार नाही. उलट त्यांच्या श्रद्धा, परस्पर जिव्हाळा व सहकार्याची भावना, प्रामाणिकपणा, नृत्यगीते इतकेच नव्हेतर लोकगीते व लोककथा ह्या गोष्टी कोणत्याही प्रगत संस्कृतीशी तुलना केल्यास कमी प्रतीच्या तर ठरणार नाहीतच उलट कांकणभर सरसच ठरतील. परंतु हे सर्व करण्यास उणीव असेल तर ती म्हणजे भाषेची. माडिया लोक बोलतात, लिहीत नाहीत, कारण त्यांच्या भाषेला लिपी नाही. बाह्य जगातील लोकांना त्यांची भाषा व त्यांना इतर जनांची भाषा समजत नाही त्यामुळे संभाषण अशक्य होते. बाह्य जगाशी सांस्कृतिक देवघेव होऊ शकत नाही. त्यांच्या भाषिक व वाङ्मयीन समृद्धिची जाणीव बाह्य जगाला येऊ शकत नाही,

* *

# प्रकरण नववे

## माडियांच्या बोलीतून प्रगटणारे लोकजीवन

### सांस्कृतिक अभिव्यक्ति :–

भाषेला अभिव्यक्तिचे साधन म्हणून पहात असताना प्रत्येक व्यक्तीच्या आणि समाजाच्या अनुभवभिन्नतेप्रमाणे तिचे स्वरुप बदलते. एक सामाजिक संस्था किंवा समाज व्यवहाराचे साधन म्हणून भाषेचा उपयोग म्हणजे प्रामुख्याने अनुभव व्यक्त करणे, जुने ज्ञान नव्या पिढीपावेतो पोहचविणे, नवे ज्ञान शोधून काढून ते पुढील पिढीपर्यंत पोहोचेल अशा रीतीने त्याचा संचय करणे, ह्या गोष्टी समाजजीवनाला आवश्यक व महत्वाच्या ठरतात. त्यामुळे बदलत्या जीवनप्रवाहाचे चित्र भाषेत उमटत असते. जीवनातील विशिष्ट रंग आणि प्रवृत्ती ह्यांना व्यक्त करण्याचे कार्य जेव्हा भाषा करते तेव्हा ती संस्कृतीदर्शक ठरते. प्रत्येक समाजात व्यक्ती आणि समाज ह्यांच्याकडून कोणतीही गोष्ट एका विशिष्ट प्रकारे प्रगट होत असते. सामाजिक स्तरावर वर्षानुवर्षे अशा प्रवृत्ती रुढ होतात. समाजाच्या रुढीत जे काही वैशिष्टचपूर्ण असते, समाजाला अभिमान वाटावा असे असते किंवा ज्याला आदर्श मानून त्या समाजातील व्यक्ती वागतात त्याला त्या समाजाची संस्कृती म्हणता येईल. मानववंशशास्त्र किंवा समाजशास्त्राच्या दृष्टीकोनातून पहाता कोणत्याही समाजात एका विशिष्ट काळी दृगोच्चर होणाऱ्या धर्म, रुढी, प्रथा, परंपरा, साहित्य किंवा वाङमय, संगीत किंवा कला इत्यादींच्या समुच्चयाला त्या समाजाची संस्कृती संबोधण्यात येते.

वरील गोष्टी, केवळ वागण्याच्या पद्धती आणि बोलणे, गाणे, लिहीणे इत्यादीतूनच बाह्य जगापुढे प्रगट होतात, आणि ह्या ठिकाणी, भाषा हे संस्कृतीचे साधनच नव्हे तर वाहक ठरते. आधीच्या पिढीकडून पुढच्या पिढीला संस्कृतीचे हस्तांतरण करणारी भाषा ही एक परंपरा ठरते. पण संस्कृतीच्या ह्या विविध अंगाचे दर्शन ज्यातून होते त्या माध्यमाचा म्हणजे भाषेचा अभ्यास क्वचितच करण्यात येतो. उलट लिपीबद्ध आणि नियमबद्ध व त्यामुळे निर्विकार आणि जिवंतपणा संपुष्टात आलेल्या भाषेचाच अभ्यास जास्त होतो, म्हणजे लेखनाचाच जास्त अभ्यास होतो. जिवंत भाषा ही ध्वनींची बनलेली आहे, त्यामुळे श्रवणगोचर आहे. तिच्यात वेगवेगळ्या छटा आढळून येतात. ध्वनीचे परिवर्तन होत असते. अशा

रितीने ध्वनी, शब्द संपत्ति, शब्दप्रयोग, वाक्यरचना तसेच उच्चारातील 'हेल' किंवा 'लकबी' ह्या वैशिष्टयांनी युक्त अशी भाषा हीच खरी संस्कृतीचे अंग असते, म्हणून ज्यांना आपण मागासलेले समजतो त्यांच्याजवळ जाऊन त्यांच्या संस्कृतीचे व भाषेचे एकत्रित अध्ययन केल्याने संस्कृतीचा अभ्यास करणे सुलभ होते.

माडिया भाषा ही एक मौखिक परंपरा आहे. ह्या परंपरेत लोकगीते, लोककथा, धार्मिककथा व कहाण्यांचा समावेश आहे. लोकगीते, लोककथा ह्यांचा एक संच तयार होत असतो. संस्कृती गटाप्रमाणे, त्यांचा साचा बहुतांशी कायम रहातो आणि हा संच एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे आपल्या विकार, अविष्कार आणि प्रेरणांसह संक्रमित होतो, प्रत्येक पिढी आपल्या गरजेनुसार त्यात भर टाकते किंवा काटछाट करते.

त्याचप्रमाणे ह्या गोष्टी भूसंबद्ध संस्कृतीशी जखडलेल्या असतात. त्यामुळे त्यांच्या जतनाची निश्चित तंत्रे तयार होतात आणि म्हणून त्यांच्यात एक प्रकारची स्थिरता असते.

अलिखित परंपरेचे महात्म्य तिच्या सामुहिकतेत आहे. सामूहिकतेमुळेच सामाजिक कार्यासाठी तिचे सहाय्य होते. सभोवतालच्या सांस्कृतिक जीवनातील नवनवीन चेतकांना पडसाद देण्याचे सामर्थ्यंही तिच्यात असते.

मौखिक परंपरेच्या कार्याचे तज्ञांनी केलेले विवेचन व माडियांच्या लोककथा किंवा लोकगीते अभ्यासताना प्रस्तुत लेखिकेला मार्गदर्शक ठरले आहे.[1]

प्रस्तुत अभ्यासातही माडियांच्या बोलभाषेचा आणि संस्कृतीचा परस्पर संबंध अशाच स्वरुपाचा आहे.

**पर्यावरणाचा प्रभाव –**

प्रामुख्याने घनदाट अरण्यात पिढ्यानपिढ्या वास्तव्य करणाऱ्या, रुसोच्या शब्दात, 'स्वर्गतुल्य' अशा मुक्त, चिरनिरागस जीवनाचा उपभोग घेणाऱ्या माडियांच्या भाषेवर त्यांच्या समृद्ध जीवनाची व संस्कृतीची छाप आपणास प्रकर्षाने जाणवते.

त्यांच्या लोकगीतांमधून व लोककथांमधून प्रगट होणाऱ्या बोलीत, वृक्षराजी वन्यपशु व पक्षांचे मधुर कूजन, आणि सभोवतालचा परिसर अशा विविध प्रकारच्या सौंदर्यसृष्टीचे दर्शन घडते. त्यातील विचारांची समृद्धी विपुल आणि

---

१. रानडे, अशोक — लोकसंगीत–शास्त्र, भारत मुद्रक आणि प्रकाशक, औरंगाबाद, 1975, पृ. 15–16

मौलिक आहे. त्यांच्या लोकवाङमयात सुद्धा त्यातील कल्पना व रचना अत्यंत चातुर्यपूर्ण असून भाषेत लाघवीपणा आढळतो. नृत्यगीते विलोभनीय असून प्रत्येक शब्दाची निवड ही ध्वनी, लय, गीतांची ढब, स्वर, पदन्यास आणि वन्य–वाद्यांचे पार्श्वसंगीत ह्यांच्याशीं सुसंबद्ध होईल अशी असते.

शृंगाराला प्रत्येक वाङ्मय प्रकारात प्राधान्य असून निसर्गातील फळे, फुले, झाडे, पशुपक्षी इ. उपमांवर शृंगारिकता आधारलेली आढळते. प्रख्यात रेलां ऽऽ, नृत्य पाहिल्यास व ऐकल्यास या विधानाची सत्यता पटते.

व्यक्तिच्या वैयक्तिक किंवा कौटुंबिक जीवनात त्याचप्रमाणे सामाजिक जीवनात कोणत्या सवयी आढळतात. जीवनाची ठेवण कशी आहे. ह्याचा ठसा भाषेवर उमटतो हे भाषाशास्त्रज्ञांना मान्य आहे. माडियांच्या जीवनात घाईगर्दी हा प्रकार नाही. जीवन हे संथ आहे. गती अतिशय मंद आहे. गरजा जेमतेम आहेत. द्रव्य किंवा इतर कोणत्याही वस्तुसंचयाची ओढ किंवा वृत्ती नसल्याने तो बराचसा आळशी आहे. प्रदीर्घ व ज्यात संथपणा प्रगट होईल; असे शब्दोच्चार हे ह्या जीवन वैशिष्टयाचे प्रतिबिंब म्हणता येईल. कारण वेळेला किंमत नाही. वेळेचे महत्व नाही, शिवाय कुठल्याही प्रकारची घाई नाही.

| | | |
|---|---|---|
| उदा. | दा ऽऽ यना | जाणे |
| | वा ऽऽ यना | येणे |
| | मा ऽऽ ड्ना | विसरणे |

या सर्व शद्बोच्चारात 'दा', 'वा', 'मा' चा फुरसतीने, लांबवून उच्चार होतो संभाषणात तो प्रकर्षाने जाणवतो.

## धार्मिक कल्पनांचे योगदान

धार्मिक कथा आणि देवदेवता अनेक वर्षे परंपरेने चालत आलेल्या संस्कृतीचा भागच होय असे म्हणता येईल. निसर्गावरच जीवन पूर्णपणे अवलंबून असल्याने निसर्गाची प्रमुख देवता 'बडा देव' किंवा 'महादेव' ही त्यांच्या वैयक्तिक किंवा सामाजिक जीवनाचा केन्द्रबिंदु होय. हाच बडा देव त्यांच्या या संततीचे जसे कोडकौतुक करतो तसे त्यांच्या वासनामय गैरशिस्तपणाबद्दल शिक्षाही करतो, हे त्यांच्या कथांमधून स्पष्ट होते. लाकडाचे आणि वृक्षपल्लवांचे देव हे पण त्यांच्या जीवनपद्धतीचे प्रतीक होय. देवांचे सतीस्थान देखील एखादा वृक्षच असतो. टोळीप्रमुख किंवा कुलप्रमुख हे समाजजीवनाच्या स्थैर्यासाठी आवश्यक असे दुसरे दैवत आहे. तेंव्हा त्याचे गुणगान, दर्शन इ. संबंधित कथा, गाणी, भाषासमृद्धीत भर घालतात. दसरा, दिवाळी, पेरणी, नवधान्य खाण्याची सुरुवात करण्याचा सण इ. संबंधित गाणी एकाच वेळी संस्कृती–दर्शन व भाषा समृद्धी दोन्हीही

साधतात त्यांच्या अनेक धार्मिक प्रसंगांना 'सोळा काठी अठरा ढेमसे' हे धार्मिक गाणे आवश्यक समजण्यात येते. अशी गाणी हा भाषेचा आणखी एक महत्त्वाचा सांस्कृतिक दुवा समजण्यास हरकत नाही. मंत्रतंत्र, जादूटोणा यावर त्यांचा परंपरागत विश्वास आहे. त्यासाठी जे ध्वनी वापरण्यात आले त्यांचीही बोलीभाषेत भर पडली. एका पुजाऱ्याच्या अंगात 'देवी अन्नाली' आली असता पुजाऱ्याच्या मुखाद्वारे देवी जे वक्तव्य करते ते उत्कृष्ट वाङ्मयाचे प्रतीक होय. ती कुठून आली आहे ते सांगताना म्हणते–

'मी मक्याच्या कणसातून, पाण्यातून, उमलत्या फुलातून, भूमिच्या पृष्ठभागावरून तसेच आकाशातील ढगांवरुन, खडकातून आणि पर्वतामधून दऱ्यामधून आणि दूरवरच्या देवभूमीतून आली आहे.'

'मी मरत असणाऱ्या लोकांना पाहते. त्यांना स्पर्श करते आणि बरे करते .. मी रेशमाच्या धाग्यावरून खाली उतरते...मी तेहतीस उंच बाबू, सहासष्ट मोठे किल्ले, तीन लहान व बारा मोठ्या लाटा (पाण्याच्या) व एक नदी निर्माण केली आहे. जमिनीतील खड्डे आणि विशाल पाने माझ्या सूचनेने तयार झाली आहेत. आम्ही गाणी म्हणतो, पर्वताच्या शिखरावरून खाली येणाऱ्या झऱ्यांवरून आम्ही उतरतो, उंच किनाऱ्यावरून आम्ही उतरतो. किटकासारखे उडतो. भूमीवरील प्राण्यासारखे चालतो. सर्पाप्रमाणे सरपटतो. मोठाले अभेद्य खडक फोडतो, अणि नद्यांप्रमाणे पुढे सरकतो. रेव आणि रेती काटाप्रमाणे पुढे ढकलून बारीक वाळूतून आम्ही येतो...' 'प्राण्यांचे पळणे, पक्षांचे आवाज आणि झाडावरून पडून फुटणारे आम्हीच निर्माण केले आहे.'

हे वर्णन, अजिबात न शिकलेल्या व दैनंदिन जीवनात सामान्य भाषा बोलणाऱ्या पुजाऱ्याच्या मुखातून काव्याप्रमाणे बाहेर पडलेले आहे, एकतर खरोखरच दैवी शक्ती बोलत असावी किंवा पुजारी हा उत्तम साहित्यिक असावा. वस्तुस्थिती कोणतीही असो, धार्मिक क्षेत्रातील श्रद्धा आणि त्यांची जपणूक करणारे, पुजारी–जे ह्या आदिम समाजाचे वैचारिक नेतृत्वही करतात–ह्यांच्याकडून बोलीला मिळालेली ही वाङ्मयीन समृद्धीच होय.

## विभिन्न सांस्कृतिक गटांचा परिणाम

तेलगु, कन्नड व मराठी, ह्या तिन्ही भाषिक लोकांशी संबंध आल्यामुळे त्यांच्या दैनंदिन जीवनात ह्या भाषिक गटांच्या सांस्कृतिक वैशिष्ट्याची छाप आढळते, धोतर नेसण्याची पद्धती, केस कापण्याची पद्धती, दगडी फरशा (बंडा) जमीनीत उभ्या लावण्याची पद्धती ह्या दाक्षिणात्य भागातील म्हणजे तेलगु भाषिक भागातील आहेत. त्याचप्रमाणे भाषेतही तेलगू शब्द विपुल प्रमाणात

आढळतात. तेलंगणातून किंवा महाराष्ट्राच्या चन्द्रपूर जिल्ह्यातील मराठी व तेलगु जाणणाऱ्यांमधून ज्या फिरत्या किंवा स्थायिक व्यापाऱ्यांचा त्यांच्या जीवनाशी संबंध येतो, किंवा पूर्वापार आलेला असेल, त्यांच्याकडून मराठी व तेलगु भाषेतील शब्दांची देवाणघेवाण झाली असावी असे म्हणता येईल.

इतकेच नव्हे तर भूतपूर्व ब्रिटीश अधिकारी व हल्लीचे शासनाधिकारी ह्यांच्यापासून इंग्रजी शब्द आणि त्यामागील संकल्पनाही (Concepts) त्यांच्या जीवनात त्यांनी आत्मसात केलेल्या आढळतात.

उदा. प्लॅन्टेशन, गार्ड, फॉरेस्ट.

बाह्य समाजापासून अलिप्त व अज्ञात स्वरुपाचे समाजजीवन जगणारी ही जमात सतत टिकून राहावी इतकेच नव्हे तर तिची वृद्धी व्हावी ही एक सामाजिक वा सांस्कृतिक निकड लक्षात घेऊन इतर अनेक टोळी व जमातीप्रमाणे ह्या जमातीत देखील अनेक–पत्नी–विवाह आणि विवाहपूर्व जीवनात मुला–मुलींची मुक्त जवळीक मान्य करण्यात आलेली आहे. ह्या सामाजिक–सांस्कृतिक (Socio–Cultural reality) वस्तुस्थितीला पुरक किंवा पोषक म्हणूनच की काय मुला-मुलींची एकत्रित नृत्ये व त्यावेळी म्हणण्याची चेष्टायुक्त श्रृंगारिक गीते निर्माण झालीत. यापूर्वीच येऊन गेलेल्या प्रकरणात जी गीते दिलेली आहेत, त्यात अशी उदाहरणे सापडतात. घोटुलजवळ अशी गीते म्हटल्याने शृंगारिक भावना व परस्पर आकर्षण उद्दीपीत होऊन वंश-वर्धनाच्या सामाजिक–सांस्कृतिक कार्यास, प्रोत्साहन मिळते, त्याबरोबरच, ह्या सांस्कृतिक वैशिष्टयाची छाप ह्या बोलीवरही उमटल्याविना राहत नाही. भाषा व संस्कृतीच्या आंतरप्रभावाचे (Inter–nfluence) हे उत्तम उदाहरण होय असे म्हणता येईल.

विकास कार्यक्रमाशी संबंध आल्यानंतर शाळेला जाण्याची गीते, निवडणुकीची ओळख झाल्यावर निवडणुकीशी संबंधीत गीतेही आढळतात. समाजातील बदलत्या अनुभुतीची अभिव्यक्ती भाषेतून सतत होत असते हे ह्यावरुन स्पष्ट होते.

## संस्कृती प्रगटीकरणाचे माध्यम–भाषा :–

विवाहप्रसंगी स्त्री व पुरुष मोकळेपणाने मिसळतात, आणि नववधूची तिच्या सख्या, आणि विहीणी परस्परांची गंमत करतात, किंवा चेष्टामस्करी करतात. हे सर्व त्यावेळी होणाऱ्या नृत्यगीतांमधून चालत असते. सासरी जाणाऱ्या मुलीला माहेरची मंडळी निरोप देतात. त्यातूनही त्यांच्या संस्कृतीतील हळुवार मानवी भावभावना गीतामधून प्रगट होताना दिसतात. अशा प्रकारे विवाह संबंधी विविध प्रसंगी गीत वाङ्मयात उत्स्फूर्त भर टाकली जाते. विवाह लागल्यानंतर मोठी होळी पेटवून त्या भोवती स्त्रीपुरुष जेव्हा आनंदाने नाचतात तेव्हा तो आनंद शब्दातीत असतो. अवर्णनिय असतो. शब्द जाऊन फक्त ध्वनीच

शिल्लक रहातो. ढोलकीचा नाद आणि त्याला मध्येच उसणाविल्यासारखा शद्ब–ध्वनीचा नाद एवढेच त्या प्रसंगाचे भाषिक अविष्करण असते. यावरून असे म्हणता येईल की, संस्कृती–प्रगटीकरणाचे भाषा हे एक प्रमुख साधन असले तरी भाषा ही स्वतः संस्कृतीचा एक घटक बनलेली असते. संस्कृतीवर झालेला प्रभाव किंवा त्या संस्कृतीची वैशिष्टये जेव्हा साहित्य किंवा वाङमयातून प्रकट होतात तेव्हा त्यासाठी अनुरूप अशी भाषाही प्रचारात येत असते. ह्यातच भाषा, इतर संस्कृती व इतर भाषांमधून काही शब्द आत्मसात करते, म्हणजे भाषेत झालेल्या बदलावरून सांस्कृतिक परिवर्तनही लक्षात येते. दाक्षिणात्य संस्कृतीची बरीच छाप माडियांच्या संस्कृतीवर आढळते व दाक्षिणात्य भाषांचाही प्रभाव आढळतो. मराठी किंवा हिंदी भाषिक संस्कृतीचा प्रभाव असल्यामुळे ते देखील शब्द ह्या भाषेत आढळतात इंग्रजी शब्दही जसेच्या तसेच वापरण्यात आले आहेत हे आपण पूर्वीच बघितले आहे. ह्या दृष्टिने एक अगदी अलिकडचे उदाहरण देण्या-सारखे आहे. १९७४ ते ७६ च्या दरम्यान शासकीय कार्यक्रमाचा एक भाग म्हणून 'संतती नियमन' शस्त्रक्रियांना प्रोत्साहन मिळाले आणि नेमून दिलेले लक्ष्य पूर्ण करण्यासाठी शासकीय अधिकाऱ्यांनी ह्या लोकांना यांच्यावर दबाव टाकून शस्त्रक्रिया करण्यास भाग पाडले. त्यामुळे त्या काळात ऑपरेशन ह्या शब्दाचो ह्या लोकांना फार भिती वाटू लागली होती आणि हा शद्बही जसाच्या तसाच रुढ झाला. म्हणजे एका शासकीय कार्यक्रमाचा प्रभाव त्यांच्या जीवनावर इतका झाला की, त्यामुळे 'ऑपरेशन' हा शद्ब व ती प्रक्रिया दोन्हीही त्यांना परिचित झाले. अशा प्रकारे भाषा ही, पूर्वी ज्ञात असलेल्या, नवीन ज्ञात झालेल्या, सामाजिक सांस्कृतिक घटकांचे किंवा संकल्पनांचे प्रगटीकरण करीत असते व त्याबरोबरच समृद्धही होत जाते.

शद्बसंग्रह आणि व्याकरण ह्यांच्यावर उत्तम प्रभुत्व असूनही अतिशय सामान्य वस्तू, कल्पना आणि घडामोडी परभाषेत व्यक्त करताना जी अडचण भासते ती भाषिक अडचण कधीच नसते तर ती सांस्कृतिक अडचण असते. उदा, अमेरिकन लोकांना 'ओवाळणे' ह्या शद्बाचा आशय आणि सांस्कृतिक महत्त्व शद्बाचा अर्थ कितीही स्पष्ट करून सांगितला तरी, समजू शकत नाही. एखाद्या व्यक्तिच्या चेहऱ्याभोवती दिवा ओवाळणे ही प्रक्रीयाच त्या लोकांना गमतीदार वाटते. कारण त्या मागील संबंधीत व्यक्तिची भावना आणि त्या क्रियेचे सांस्कृतिक पावित्र्य समजण्यासाठी लागणारी मनाची भावनात्मक घडण तेथे नाहीच.

साहित्य अकादमीच्या उपाध्यक्षपदी असताना प्रख्यात साहित्यिक श्री. प्रभाकर माचवे ह्यांना निवडक मराठी नाटके व कादंबऱ्या ह्यांचे रशियन भाषेत भाषांतर करताना एक गमतीदार अडचण आली. ती त्यांनी नागपूरला विदर्भ साहित्य संघात;

' भाषणात सांगितली, ती अशी की ' ' इश्श ह्या शब्दाला रशियन भाषेत समानार्थी शब्द किंवा हूंकर सापडेना. नाटकातील काही संवाद तर केवळ ' इश्श' ह्या शब्दावरच अवलंबून होते, त्याचे कारण शोधत असताना त्यांच्या असे लक्षात आले की, ' इश्श ' ही प्रतिक्रीया मराठी किंवा भारतीय स्त्रिच्या ज्या मानसिक ठेवणीतून किंवा लाजाळूपणाच्या भावनेतून होते, ती ठेवण रशियन स्त्रीची नाही, म्हणजेच ही अडचण भाषिक नव्हती तर सांस्कृतिक होती.

माडियांनी 'लुगडे किंवा साडी' ह्यासाठी आपलाच शद्ब म्हणजे 'लुगडा किंवा साडी' घेतला. 'चोळी किंवा पोलके' ह्याला त्यांच्या बोलीत तर शब्द नाहीच, परंतु 'लुगडा–साडी' इतका चोळी किंवा पोलके आत्मसातही झालेला नाही, कारण माडिया संस्कृतीप्रमाणे स्त्रीने कमरेचा वरचा भाग झाकणे निषिद्ध आहे; आणि बाह्य संस्कृतीच्या संपर्कात आलेल्या ज्या मुली किंवा स्त्रिया चोळी वापरतात त्यांनी त्या क्रिया त्या शद्बांसह उचललेल्या आहेत. ह्या उदाहरणावरूनही संस्कृतीभिन्नतेप्रमाणे भाषेची ठेवण कशी बदलते हे लक्षात येते.

कोणतीही संस्कृती पूर्णपणे निर्लेप, निर्भेळ शुद्ध किंवा बाह्य संपर्कापासून मुक्त अशी कधीही असू शकत नाही हे मान्य करावे लागेल. इतर संस्कृतींशी संबंध येऊन तिच्यावर संस्कार घडत असतात. मात्र हे संस्कार घडत असताना किती प्रमाणात संपर्क आला आणि संबंधीत संस्कृतीतील लोक किती प्रमाणात स्ववंशवादी किंवा स्वसंस्कृतीनिष्ठ (Ethnocentric) आहेत, ह्यावर हा प्रभाव अवलंबून असतो. माडिया लोक भौगोलिक दृष्टचा इतर लोकांपासून दूर, अलिप्त आणि वर्षातून आठ ते नऊ महिने जेथे दळणवळण अशक्य असते अशा भागात राहतात. बाह्य जगाशी अत्यल्प संबंध असल्याने बाह्य संस्कृतीचा प्रभाव अल्पतम आहे. तसेच ते अत्यंत कर्मठ असून आपल्या संस्कृतीशी व वांशिक वैशिष्ठ्यांशी चिकटून आहेत तरीही त्यांच्यावर अनेक वर्ष अल्प प्रमाणात का होईना झालेल्या प्रभावातून आलेल्या काही गोष्टी आढळतात. उदा. चहा हे पेय. युरोपियन किंवा बाह्य जगाशी आलेल्या संपर्काचे एक प्रतिक म्हणता येईल पण त्यातही त्यांची परंपरा त्यांनी टिकवून धरली आहे. ते लोक गायीचे किंवा म्हशीचे दूध काढीत नाही. दूध काढणे पाप समजतात म्हणून माडिया बिन दुधाचा चहा पितात. मात्र 'चाय' हाच शब्द त्यांनी स्विकारला आहे.

वाळलेला कडू भोपळा किंवा इतर तत्सम फळांची भांडी किंवा मातीची भांडी परंपरागत वापरणारे माडिया बाह्य जगाशी संबंध आल्यामुळे काही भागात अल्युमिनियमची भांडी वापरू लागले. व त्याला जर्मनची भांडी किंवा 'बुगडी' म्हणू लागले. जर्मनी भांडी किंवा बुगडी हा शब्द बाह्य जगाशी आलेल्या संपर्काचे प्रतीक ठरतो.

वस्तू–विनिमयाच्या अर्थव्यवस्थेवर असलेले माडिया ' पैसा किंवा रुपया ' हा शद्ब शिकले आणि ते मोजता येत नसले किंवा मूल्य माहित नसले तरी वापरु लागले. इतकेच नव्हे तर लुबाडले जाऊ लागले. हे सर्व शद्ब बाह्य संस्कृतीचा प्रभाव पडल्यामुळेच माडियांनी आत्मसात केले.

त्याच प्रमाणे रॉकेल, साईकिल, इस्कूल मोटर, डागदर, सुई (इंजेक्शन) इ. अनेक शद्बांच्या बाबतीतही आपणास अशा प्रकारचे विधान करता येईल. आधुनिकीकरणाच्या (Modernisation) प्रक्रियेमुळे होणाऱ्या सांस्कृतिक व तद्अनुषंगाने होणाऱ्या भाषिक परिवर्तनाची ही उदाहरणे होत.

कोणत्याही समाजाची भाषा ही बहुविध असते. ती अनेक रुपे धारण करते किंबहुना ती बहुविध संस्कृतीला जोडणारा दुवा असते. दुसऱ्या दृष्टीकोनातून पाहता भाषा अशी स्वतंत्र नसतेच. खरे अस्तित्व असते ते बोलीलाच. भौगोलिक स्थान, जीवनावश्यक व्यवसाय किंवा उद्योग, इतर सामाजिक कृती, स्त्रिया, लहान मुले व वृद्ध इत्यादींचे व्यवहार व जीवन ह्या सर्वातून बोली भाषा प्रकट होते व तिचे स्वरुपही थोडेथोडे बदलते. म्हणून त्या समाज जीवनातील सांस्कृतिक वैशिष्टचे संस्था इ. कार्य शक्य व्हावे म्हणूनही तिच्यातील शब्द तयार होत असतात. उदा माडियांच्या जीवनात गीत व नृत्य ह्यांना अत्यंत महत्वाचे स्थान आहे. हे आपण बघीतलेच आहे. त्यासाठी रेला ऽऽ रे ऽऽ रिरि ऽऽ ला ऽऽ रे ऽऽऽऽ रेला ऽऽ ह्या अनुषंगाने स्वर व ध्वनी निर्माण झालेत. वास्तविक ह्या शब्दांना अर्थ असा कोणताच नाही.

त्याच प्रमाणे ' घोटुल ' ह्या शब्दाला आपल्या भाषेत अगदी समर्पक शब्द सापडणे कठीण आहे घोटूल हा निव्वळ शब्द नसून वंश परंपरागत चालत आलेल्या सांस्कृतिक परंपरेचे व वांशिक निकडीचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या संस्थेचे ते एक प्रतीक आहे.

'पोलो' 'पोलवा', फेरसापेन इ. शब्द याच प्रकारात अंतर्भूत होतात असे म्हणता येईल.

## संस्कृतीचे वेगळेपण :

एकंदरीत पाहता आपणास असे म्हणता येईल की, माडिया, सांस्कृतिक-दृष्टचा समृद्ध आहेत. आदिवासी समाज अत्यंत दुर्गम व डोंगराळ भागात राहात असल्याने इतर समाजापासून अलिप्त राहिल्यामुळे आपले वेगळेपण टिकवून आहे. माडिया अजूनही निरक्षर अवस्थेत आहे. त्यामुळे त्यांच्या प्रगतीला खिळ बसल्यासारखी झालेली आहे. बोली भाषेतील लोककथा, नृत्यगीते, ज्ञान, म्हणी ह्या एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे श्रुतींच्या स्वरुपात मौखिक परंपरेनेच

आलेल्या दिसतात. लिपी नाही म्हणून शिकण्याला ही भाषा अवघड असली तरी शब्द–संपत्तीने परिपूर्ण अशी त्यांची बोली आहे.

ह्या माडियांचे भावविश्व व समाजजीवन हे आगळे आहे. त्याला एक आंतरिक मूल्य आहे. ते परिपूर्ण आहे.

सामुहिक जीवन हे संथ, शांत व परस्पर सामंजस्याचे राहील ह्याची ते कटाक्षाने काळजी घेतात. त्यासाठी धर्माचरण, धार्मिक श्रद्धा, रीतीरिवाज, कर्मकांड शिष्टाचार, रुढी आणि परंपरा ह्यांच्या नियमांचे पालन करीत असताना आपणास दिसतात. त्यासाठी पंचायत, पेरमा, पुजारी, इ. बाबींना ते आवर्जून शरण जातात. सामुहिक जीवनाच्या आड त्यांच्या वैयक्तिक बाबी कधीही येताना आढळत नाही.

आर्थिक जीवनाच्या बाबतीतही ते बरेच उदासीन आहेत. पोटापुरती किंवा उपभोगापुरती कमाई असा साधा, सरळ आर्थिक विचार दिसतो, त्यामुळे माडिया हा काहीसा अल्पसंतुष्ट बनलेला आहे. उलटपक्षी जादूटोणा, मंत्र–तंत्र व आधि-भौतिक विश्वासंबंधी मात्र अतिशय संपन्न ज्ञान प्राप्त केलेला आहे. प्राणी, जमीन, वातावरण, निसर्ग, ह्यासंबंधी अनुभवावर आधारलेले माडियांचे ज्ञान भरपूर आहे. माडिया हे निसर्ग सान्निध्यात सतत राहत असल्याने स्वच्छंदी जीवनाचा जरी पुरस्कार करणारे असले तरी रितीरिवाजांचे बंधन त्यांच्यात आढळते. विवाह प्रकार, वैशिष्टयपूर्ण कौटुंबिक जीवन, 'घोटुल' सारख्या सामाजिक संस्था, आप्तसंबंधाविषयीचे नियम ही त्यांच्या सामाजिक जीवनाची महत्वाची अंगे आहेत. म्हणूनच स्वच्छंदी जीवन जगणारे असूनही त्यांच्या जीवनाचा तोल हा ढळलेला आढळणार नाही.

म्हणूनच पुरेसे खायला नाही, प्यायला पाणी नाही, तरीही त्यांचे जीवन समाधानी, तृप्त व आनंदी आहे. माडियांची संस्कृती ही उच्च प्रतीची व पुरातन आहे हे निर्विवाद आहे. अशा संस्कृतीचे प्रतिबिंब उमटलेली आणि तिचे वाहक असलेली त्यांची बोली–भाषाही ह्या संदर्भात त्यांच्या संस्कृती इतकीच पुरातन ठरते व म्हणून त्यांच्या संस्कृतीच्या अध्ययनाचे एक मौलिक साधनही ठरते.

*

# परिशिष्ट क्रमांक एक – माडियांची नावे

भामरागड विभागातील निवडक खेड्यांमधील माडियांची नावे.

## बडा माडिया :–

| खेड्याचे नाव | नाव | वडिलांचे नांव | कुलनाम किंवा गोत्र |
|---|---|---|---|
| लाहेरी | विज्जा | मूका | पुंगाटी |
| | दोगे | पोरिया | भोगामी |
| हिदुर | बोंगे | पांडु | पुंगाटी |
| | पांडु | दुंगा | दुरवा |
| | बिच्चा | विज्जा | वड्डे |
| | दोगे | विज्जा | गाडवे |
| | मासा | दसरु | गोटा |
| | दोगे | बोडंगा | अलामी |
| | पुसु | बिच्चा | पुंगाटी |
| | डुंगा | गोगा | तिम्मा |
| | कोहला | बोंडे | पुसाली |
| | गट्टी | बोडगा | नागोटी |
| | पोरीया | डुंगा | दुर्वा |
| दिरंगी | डुंगा | बह्या | जेट्टी |
| | दुग्गे | कोरके | मटामी |
| कुवाकोडी | केये | गुडसा | उसेंडी |
| | येरमा | वंगा | उसेंडी |
| | सैतू | उरनी | उसेंडी |
| | केये | अटिया | परसा |
| | पेंदा | बुसी | उसेंडी |
| | आगा | करवे | कडंगा |
| | कुम्मा | दुडी | कडंगा |
| | काना | दसरु | उसेंडी |
| | बत्ते | बंगा | उसेंडी |
| | जाग | शिगा | कोडगा |
| | टुग्गे | चूवकू | उसेंडी |

छोटा माडिया :-

| | | | |
|---|---|---|---|
| पुसवरा | भुरा | मासा | पुंगाटी |
| | कोत्ती | बंडे | भोगामी |
| लाहेरी | कटियां | — | भोगामी |
| | जोगी | दोवा | पट्टी |
| | पांडू | हरा | भोगामी |
| | हेवडा | अडवे | भोगामी |
| | गोगी | कोपा | भोगामी |
| | उलगे | जोगी | कुडमेटी |
| | पेडू | नूसा | पल्लो |
| | माहादू | पागू | पेरमा |
| | नूरा | दामा | परसा |
| | वंजा | दसरु | गोटा |
| | गोगा | मुसरा | कुडय्यामी |
| | दोगी | गुडमसा | पुंगाटी |
| | पुसु | गिल्ला | बोगामी |
| | पातलु | डोलु | तिम्मा |
| | दोगे | आडवे | कुडयामी |
| | पोरीया | जेगे | डूरीकू |
| | वाले | पांडू | बोगामी |
| | पेका | पुसा | आतलामी |
| | मंगरु | पोट्टी | ओक्सा |
| जुव्वी | कुम्मा | पांडु | पुंगाटी |
| | लेबे | डुग्गे | ताडो |
| | बंडे | वेल्ला | कोरसा |
| | कोहला | वंजा | कुडय्यामी |
| | झुरु | वंजा | पुसामी |
| | केय्ये | मीना | ओडामी |
| | पांडू | वंजा | कुडयामी |
| | कुम्मा | केये | मंज्जा |
| | बत्ते | बय्या | पुंगाटी |
| | केये | वंगा | पुंगाटी |

| | | | |
|---|---|---|---|
| होडरी | पुसु | पुकरी | विडपी |
| | जोगा | बोडंगा | विडपी |
| | अडवे | जागा | गाडवे |
| | पेका | दोगे | विडपी |
| | उलगे | गांडा | दुख्खो |
| | रामा | पोरिया | तिम्मा |
| | अडवे | विल्ला | तिम्मा |
| | केये | अडवे | तिम्मा |
| | पांडू | माहरु | तिम्मा |
| | मंगरु | गेलु | वडे |
| | गिल्ला | बोडंगा | विडपी |
| | सयतू | मूरा | हक्को |
| | अडवे | जोगा | गावडे |
| | फकरी | दोगे | विडपी |
| | नगो | माहरु | विडपी |
| कुम्मरगुडा | सैंजु | बंडे | लेकामी |
| | सुकू | बोडंगा | पुंगाटी |
| | कोमटी | नेवलू | कोरसामी |
| | बेडे | गुज्जा | कोरसामी |
| बिना गुंडा | साईबी | काना | दुर्वा |
| | सयतु | काजा | दूरवा |
| मुरंगल | पोरिया | इकटा | दूरवा |
| | मासा | केये | पुंगाटी |
| | नरंगो | इरपा | पुंगाटी |
| | टुग्गे | हारा | पुंगाटी |
| | काणा | बह्यया | पल्लो |
| | मासा | केय्ये | पुंगाटी |
| | इरपा | दस्सा | वड्डे |
| | बोडंगा | जल्ला | परसा |
| गोल्लागुडा | इरपा | पेंदा | पुंगाटी |
| | कोपा | गोगा | पुंगाटी |
| | वाले | मुरा | पुंगाटी |

| | | | |
|---|---|---|---|
| हिद्देवाडा | इरपा | मुरा | कतलामी |
| | नरगो | इरगा | पुंगाटी |
| | रामा | गुडरू | पुंगाटी |
| | भिमा | पोदी | मज्जी |
| | डोली | इरपा | तिम्मा |
| | बय्या | मासा | मोहंदा |
| कायनगुडा | कल्लू | -- | पुंगाटी |
| | कुम्मा | मादी | मुडमा |
| मोरामेट्टा | मुका | विज्जा | पुंगाटी |
| | गिल्ले * | विज्जा | मज्जी |
| | डोवा | केचे | पुंगाटी |
| पराईनार/पोरनार | दोगे | गुट्टा | होयामी |
| | कोरके | पांडू | होयामी |
| | इरपा | करपा | पल्लो |
| | नेरो * | बिच्चा | माहका |
| | कारी * | दोगे | माहका |
| | माली * | उलगे | माहका |
| | मसरी * | उलगे | कांडगा |
| | गिल्ले * | वाणी | माहका |
| | रेमटी * | उलगे | माहका |
| | मुल्ला | कोपा | माहका |
| | मुकू | दोबा | पुंगाटी |
| | इरपा | मुरा | मिळया |
| | विज्बा | डोलू | नैताम |
| | केये | मैदा | गिच्चा |
| आरेवाडा | पोरिया | विच्चा | गावडे |
| | गिल्ला | महारु | वड्डे |
| कवंडे | मुका | डोल्ो | पल्लो |
| | टुग्गे | मुसा | वड्डे |
| | मादी | वंगा | वड्डे |
| | पुसू | मीना | पुंगाटी |
| | डुंगा | मूका | वड्डे |

| | | | |
|---|---|---|---|
| **गॉंगवाडा** | बोरका | मुल्ला | पल्लो |
| | पोवरी | दस्सा | मडकामी |
| | मासा | गिल्ले | पुंगाटी |
| | कये | मासा | पल्लो |
| | सुक्कू | कोंदा | मेंडियामी |
| | विज्जा | बूडगा | आहका |
| | पुसू | बूडगा | आहका |
| | विज्जा | काणा | मुहंदा |
| | दसरु | गट्टी | मडकामी |
| | सेतु | गट्टी | मडकामी |
| | मासा | बुडगा | वड्डे |
| **कुरसीनार** | पांडू | बंडे | घेरमा |
| | कुम्मा | इरपा | तेलामी |
| | कारे | इरपा | बंडे |
| | करवे | मारा | तेलामी |
| | आदी | बय्या | मोटामी |
| | कारे | इरपा | दुर्वा |
| | दोगे | वाले | तेलामी |
| | मालू | दोलु | पुंगाटी |
| | दसरू | मासा | तेलामी |
| | जोगी | इरपा | तेलामी |
| | विज्जा | विट्टा | वाचामी |
| **पीयरकोठी** | इरगू | मोगे | वडे |
| | सैयतु | मुरा | अलामी |
| | गिल्ला | दसरु | मटामी |
| | मुसरा | मासा | मटामी |
| | मुरा | फरवे | अलामी |
| | मूरा | दसरू | फातो |
| | आगे | दोगे | वड्डे |
| | पेका | वज्जा | मटावी |
| | वाले | बंडे | मुहुद्द |
| | फरवे | बोडंगा | वेडू |
| | सुकू | सैतु | वड्डे |
| | डोलू | क.रे | मटामी. |

* ही स्त्रियांची नावे होत.

## परिशिष्ट क्रमांक दोन–खेड्यांची सूची

**एटापल्ली पंचायत समितीमधील भामरागड विकास खंड विभागातील खेड्यांची सूची**

| | | |
|---|---|---|
| अडंगा | अलदंडी | आलेंगा |
| आरेवाडा | बडशी | बान्दे |
| बंगाडी | बेज्जूर | बेसेवाडा |
| भामरागड | भाटपार | भुसेवाडा |
| बिद्री | बीनागुंडा | बोडामेट्टा |
| बोरीया | बोटनखुंडी | बोडांगे |
| बुर्गी | चिचोडा | दामनमरका |
| दरभा | देवपाडी | धोडराज |
| दोडेपल्ली | दुहागुडम | प्रकडुम्मे |
| फोदेवाडा | फुंडी | गारदेवाडा |
| गट्टा | गट्टागुडा | गोटपाडी |
| गिल्लनगुडा | गोदेल्ली | गोल्लागुडा |
| गोंगवाडा | गोपनार | गोरानूर |
| गोरगुट्टा | गोंडापूरी | गुंडेनहोड |
| गुंडेजून | गुंडूरवाही | हालोदंडी |
| हालवेर | हेदरी | हेमलकसा |
| हिक्केर | हिंदेवाडा | हितपाडी |
| हिद्दूर | होडरी | हितवारा |
| इरपनार | इतलनार | जांबिया |
| जिजगाव | जुव्वी | करमपल्ली |
| कसनसूर | कथलासूर | कवन्दे |
| कोडमर्रा | सान्दीनेन्दवाडा | कियार |
| कोन्दवाही | कोसापुंडी | कोयानगुडा |
| कोयार | कुचेर | कुडकेली |
| कुकामेटा | कुमरगुडा | कुंजेमरका |
| कुम्हूर | कृष्णार | कुवाकोडी |
| लाहेरी | लष्करी | मालेंगा |
| मल्लमपोद्दुर | मारधूर | मानगुंटा |
| मानडकुही | मरकल | मारहनार |
| मेडपल्ली | मोडस्के | मोहंडी |

| | | |
|---|---|---|
| मोरडपूर | मुरंगल | मुरुमभुशी |
| मूरवाडा | गुसापाडी | नारगुंडा |
| नेलगोंडी | नंदवाडी | मिरगुंडवांच्छा |
| पाडूर | पडतामपल्ली | पयमा |
| पल्ले | पराईनार | परसलगोंदी |
| पिडमिल्ला | पयन्दीगुण्डम | पोक्कूर |
| पोयरकोटी | पुंगासूर | पुसकोटी |
| पासूमपल्ली | पुसावारा | रानी पोदूर |
| रेकाभाटल | रेकनार | सूरजागड |
| ताडगाव | ताडगुडा | तित्तीकुडम |
| टेकला | तिमेली | तिरकामेट्टा |
| तितोडा | तोडसा | तुमरकोडी |
| तुर्रे मरका | वाटेली | वेंगदूर |
| विसामुंडी | वाडवी | वांगेतूरी |
| व्हटेली | बेलमागड | येमली |
| झारेवाडा | केहकापारी | अबनपल्ली |
| बचबोडी | रेकामेट्टा | उडेरा |

# संदर्भ ग्रंथ

## इंग्रजी ग्रंथ


| | |
|---|---|
| Deogaonkar, S. G. (Dr) | Problems of Development o Tribal Areas. |
| -do- | Madias of Bhamragad. |
| Elwin Verrier (Dr) | The Kingdom of the young |
| -do- | Maria, Murder and Suicide. |
| -do- | The Muria and Their Ghotul. |
| -do- | Tribal world of Verrier Elwin. |
| Fishman, Joshu A. | Language in Socio-Cultural Change |
| Furer Haimendorf, C. Von (Prof.) | Gonds of Andhra Pradesh. |
| Grigson, W. V. | The Maria Gonds of Bastar. |
| Grierson G. A. | Linguistic Survey of India. (Vols. IV, X) |
| Govt. of Maharashtra | Schedued Tribes In Maharashtra Vol. X |
| G. O I. Publication Div. | The Tribal People of India, Vol. |
| The Illustrated Encyclopaedia of Man-Kind. | (London-1978) |
| Knabe, W. K. (Dr) | Maria Religion. |
| Maharashtra State, Gazetteers of India | Chandrapur District Gazetteer. (Revised Edition) |
| Pagdi, Setu Madhavrao. (Dr) | A Grammer of Gondi Language |
| Patwardha, (Rev.) V. B. S. | Gondi Man ual. |
| Russel and Hiralal | The Tribes and Castes of the Central Provinces of Bastar. |
| Samarin | Field Linguistics. |

UNPUBLISHED

| | |
|---|---|
| Deogaonker S. G. (Dr) | Bhamragad Research Project-Report. |

# मराठी ग्रंथ


| | |
|---|---|
| अग्नीहोत्री, द. ह. | मराठी वर्णोच्चार विकास. |
| कालेलकर, ना. गो. (डॉ.) | भाषा :– इतिहास आणि भूगोल. |
| –,,– | भाषा आणि संस्कृती. |
| –,,– | भाषा, बोली आणि लेखन. |
| काळे, यादव माधव. | नागपूरकर भोसल्यांचा इतिहास. |
| कुळकर्णी, कृ. पां. | मराठी भाषा उद्‌गम व विकास. |
| –,,– | शद्व, उगम आणि विकास. |
| कर्वे, इरावती (डॉ ) | मराठी लोकांची संस्कृती. |
| गजेन्द्रगडकर, श्री. न. | भाषा आणि भाषाशास्त्र. |
| ग्रामोपाध्ये, (डॉ.) | भाषा, विचार आणि मराठी भाषा. |
| जोशी, प्र. न. | सुबोध भाषाशास्त्र. |
| तोडासे, एम. जे. | धार्मिककथा, बडादेव दर्शन, फेरसापेन पुजा. |
| थत्ते, अनिल | भामरागडची भ्रमणगाथा. |
| नाडगोंडे, गुरुनाथ (डॉ.) | भारतीय आदिवासी. |
| नारगोळकर, व सौ. नारगोळकर | जंगलचे राजे. |
| पानसे, मु. ग. | भाषा :– अंत:सुत्र आणि व्यवहार. |
| परुळेकर, गोदावरी | जेंव्हा माणुस जागा होतो. |
| भागवत, दुर्गा | लोकसाहित्याची रुपरेषा. |
| –,,– | धर्म आणि लोकसाहित्य. |
| भांडाकर, पु. ल. | सामाजिक संशोधन पद्धती. |
| मांडवकर, भाऊ (डॉ.) | कोलाम. |
| –,,– | आदिम. |
| मालशे, स. गं. (डॉ.) | शोध निबंधाची लेखनपद्धती. |
| मांडे, प्रभाकर (डॉ.) | लोकसाहित्याचे अंत:प्रवाह. |
| –,,– | लोकसाहित्याचे स्वरुप. |
| महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, | कन्नड भाषा प्रवेश. |
| –,,– | तेलगु भाषा प्रवेश. |
| महाराष्ट्र लोकसाहित्य समिती | महाराष्ट्र लोकसाहित्य माला-पुष्प चौथे, |
| राजूरकर, अ. ज. | चन्द्रपुरचा इतिहास. |

वऱ्हाडपांडे, व. कृ. (डॉ.) नागपूरी बोली.
वैद्य, गोसावी, सहस्त्रबुद्धे, देव मराठी भाषाशास्त्र.
संत, दु. का. संशोधन, पद्धती प्रक्रिया अंतरंग.
संगवे, विलास (डॉ.) आदिवासीचे सामाजिक जीवन.


## नियतकालीकात प्रकाशित लेख


जोशी, वि. वा. 'गोंडवन, नव्हे माडियांचे नंदनवन,' **सह्याद्री**, खंड ३७, अंक २ रा फेब्रु. १९५३

कुळकर्णी, सु. बा. (डॉ.) 'द्राविडभाषा परिवार' **नवभारत**, वर्ष २८, अंक ११ व १२, ऑगस्ट, सप्टेंबर १९७५, प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई.

बडवे, महादेव रामचन्द्र 'रेलॉ रिरीलो' **दै. लोकमत** साहित्य–जत्रा नागपूर दि. २५ जुलै १९७६

मेश्राम भुजंग 'गोंडी भाषेचे भवितव्य,' **दै. लोकमत** साहित्य जत्रा, नागपूर, दि. ३ फेब्रु. १९८०


*

# – शुद्धिपत्रक –

| पृ. क्र. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६ | २१ | तक्त्यात दिलेले आहे. (तक्ता क्रमांक एक) | पूर्ण वगळावे. तक्ता जोडलेला नाही. |
| | २३ | तक्ता क्रमांक २ मध्ये दिलेले आहे. तक्ता क्र. २ वरून | पूर्ण वगळावे. तक्ता जोडलेला नाही. |
| ६ | २ | 'संस्थाल' | संथाल |
| ११ | २१ | सहमांची | समूहांची |
| १२ | १० | संबंध | संबंधित |
| १८ | २ | कचेतन | अचेतन |
| १९ | मथळा–२ | भाषिक वंश | परिच्छेदाचा मथळा समजावा |
| २० | ७ | प्रभावर | प्रभाव |
| २० | ९ | शब्दसंचायात | शब्दसंचयात |
| २० | २८ | समाजसेवर्यींचा | समाजसवर्यींचा |
| २१ | ४–मथळा | भाषची | भाषेची |
| २१ | ११ | हात | होत |
| २१ | १४ | ताच | तोच |
| २२ | १ | गोंडांच | गोंडांची |
| २२ | १९ | बालीच्या | बोलीच्या |
| २३ | ३० | रडुवीसा | रेंडूविसा |
| २५ | ११ | सत्तुम | खत्तुम |
| २५ | १४ | कुही सुवा | कुही/सुवा |
| २६ | ३१ | नोष्टिंग नोष्टी | गोष्टिंग गोष्टी |
| २८ | १४ | डुब्रल | डुब्राल |

| पृ. क्र. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३० | २१ | ज | जे |
| ३३ | १३ | मडु | मुडु |
| ३३ | १४ | नाल | नालु |
| ३४ | १२ | पाळु | पालु |
| ३५ | २५ | मब्र | मब्बु |
| ३६ | २२ | रसावरून | रूपावरून |
| ३७ | १४ | कुही सुवा | कुही / सुवा |
| ३९ | २५ | पावतांचे | पावेतोंचे |
| ३९ | २८ | उंदी कमी विसा = एकोणवीस वीसा | उंदी कमी विसा = एकोणवीस |
| | २९ | उंदी=एकवीस रंडु वीसा=चाळीस इ. | वीसा उंदी=एकवीस रेंडू वीसा=चाळीस ई. |
| ४२ | २२ | शद्व | शद्वात |
| ४३ | ४ | शद्ववयवाची | शद्वावयवाची |
| ४३ | ५ | व्यजनाचा | व्यंजनांचा |
| ४४ | २ | सातव्या | चवथ्या |
| ४४ | २० | दोन | दोर |
| ४४ | २८ | हरींगम | इरींगम |
| ४५ | १ | यल्लू | येल्लू |
| ४५ | ३३ | वसी | बुसी |
| ४६ | ३ | येडको | येडकी |
| ४७ | ११ | मालका | मोलका |
| ४७ | १४ | व्यगोगई | व्यंगोगई |
| ४७ | १७ | होंडा | ऱ्हांडा |
| ४८ | १६ | नेत्तराला | नेत्तराल |

| पृ. क्र. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ४९ | १७ | कोड़ीयल | कोड़ीयड |
| ४९ | १८ | कायतोर | कोयतोर |
| ५० | २३ | अपांग | आपांग |
| ५२ | १३ | आगु | ओगु |
| ५२ | २८ | टाकणे | टाकणारे |
| ५४ | ८ | मन्दानो | मन्दाना |
| ५४ | २२ | ते | तू |
| ५७ | १९ | याग्व्हुन | याग्व्हुनु |
| ५९ | १४ | बस्कंटकु | बस्केटकु |
| ५९ | २५ | इच्छुक | इच्चुक |
| ६० | १० | सातव्या | पाचव्या |
| ६० | ३० | येड्की | येडकी |
| ६२ | ३ | ' अ ' | ' ॲ ' |
| ६३ | ९ | उकी | उको |
| ६३ | ३१ | पो | पोताना |
| ६६ | १६ | ' ब ' | ' ह ' |
| ६६ | २० | ' मा ऽ हि : या ऽ : ' | ' मा ऽ न्हि : या ऽ : ' |
| ६९ | २८ | ' अयो ' | ' अयी ' |
| ७० | ९ | वडंज | वडंजु |
| ७४ | १ | दरयना | दायना |
| ७४ | ८ | आनवडी | आनचाडी |
| ७५ | ८ | इश्वर | ईश्वर |
| ७५ | १० | विंच चिंच | चिंच |
| ७८ | १० | गाटा | गाटो |
| ७९ | ११ | जो र अ सा मी | ज़ो र अ सा मी |

| पृ. क्र. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ८३ | १ | नलनरकल | मंलनरकल |
| ८४ | २ | डु वा ली' | डु वा ली' |
| ८४ | ३ | डु वि या' | डु इ या' |
| ८४ | १३ | वाटाण | वाटाणा |
| ८४ | १६ | वे द्दु र' | वे द्दु र' |
| ८४ | १७ | वे ट्ट ड'' | वे ट्ट' ड' |
| ६५ | ३ | आरोळी | चारोळी |
| ८६ | १५ | इसपेरी | इसवरी |
| ८९ | २२ | लिंजी | तिंजी |
| ९० | २१ | भुत्तेसकीकू | मुत्तेसकीकू |
| ९२ | पहिल्या दोन ओळी | पहिल्या दोन ओळी चुकून छापल्या गेल्यात. | पहिल्या दोन ओळी गाळाव्यात. |
| ९२ | ५ | जोंग | जांग |
| ९२ | ५ | सोचता | तोचता |
| ९२ | ७ | वियेरसू | वियेरतून |
| ९२ | २१ | विडस्ते केननेस्तूकू | विडस्तेके ननेस्तुकू |
| ९३ | १ | वेदना | तेदना |
| ९४ | १२ | जिंजी | तिंजी |
| ९४ | १२ | जिंन्दाना | तिन्दाना |
| ९५ | १३ | योग्व्हू | येग्व्हू |
| ९५ | १५ | योग्व्हू | येग्व्हू |
| ९६ | ६ | माती | मत्ती |
| ९७ | ५ | बानाल | आनाल |
| ९८ | २२ | पल्लेला-पपू | पल्लेर-पग्पू |
| ९८ | २४ | पिंडा | पिंडी |

| पृ. क्र. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ९९ | १४ | लोतूहळू | लोतूहकू |
| ९९ | १६ | सूटींग | डुटींग |
| ९९ | २६ | पुलोग | पुतोग |
| १०० | ७ | (ते ठरवितात) | *(ते ठरवितात) |
| १०० | १२ | पेरनाल | पेरमाल |
| १०० | १४ | मावामुईतोग | मात्रामुईतोग |
| १०० | २१ | तकीतगा | तळीतगा |
| १०१ | ११ | भाट | माट |
| १०१ | ३० | वरलोसी | वरसीसी |
| ११५ | ५ | आहे, | आहे' |
| ११९ | ८ | र नेच्या | रचनेच्या |
| १२२ | १ | चवथ्या | आठव्या |
| १२२ | १९ | अरके | अस्के |
| १२३ | १२ | जाडो | जोडी |
| १२४ | २१ | अड्ड | अंट्र |
| १२४ | २३ | नम्म संगीन | निम्म संगोन |
| १२५ | २५ | मेआ | मेटा |
| १२६ | १ | 'कहाते' | कडाते |
| १२७ | १५ | बालाले | बाबाले |
| १२८ | २७ | इस्कुला | इस्कुलता |
| १२९ | २६ | लोनू बायाना | गाटो तिंदाना |
| १३३ | १ | कुमूर–सोंडा | कुमूर–तोंडा |
| १३४ | ५ | नुरो–गुत्ते | नुरो–मुत्ते |
| १३४ | ९ | 'गुरू' | 'गुर' |

| पृ. क्र. | ओळ | शुद्ध | अशुद्ध |
|---|---|---|---|
| १४४ | ९ | कोइतूम | कोइतूर |
| १४८ | तळटीप | Madia of Inter-India Publication, Bhamragad, | Madia of Bhamragad, Inter India Publication, |
| १५५ | १५ | कासव | (कासव) |
| १५५ | ३२ | आत्राम | आत्राम |
| १५६ | १० | यरेवन | येरवेन |
| १५६ | १० | वि | नावे |
| १५६ | १५ | देवतारे | देव तोरे |
| १६४ | १८ | जहे | जसे |